





नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






२७५२

अंक १, २, ३, ४

संपादक — प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग

वर्ष १६वे अंक १ला (६५) जानेवारी १९४३
वर्ष १६वे अंक २रा (६६) एप्रिल १९४३
वर्ष १६वे अंक ३रा (६७) जुलै १९४३
वर्ष १६वे अंक ४था (६८) ऑक्टोबर १९४३

अनुक्रमणिका

महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[त्रैमासिक]

## ६६

संपादक— प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग
अेम्.अे.

चैत्र १८६५

वर्ष १६ वें] अेप्रिल़ १९४३ [अंक २ ।

अनुक्रमणिका

## सभासदांस विनंती

१ समासदांनी आपापली वर्गणी कृपेने पाठवावी व पत्ते बदलले असल्यास कळवावें.

२ म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा व नियामक मंडळाची सभा यांच्या सूचना चालू अंकीं (मलपृष्ठ ३) देण्यांत आल्या असून या सभांत मांडावयांत यावयाचा अहवाल, हिशेब, अंदाजपत्रक वगैरे याच अंकीं अितरत्र छापलीं आहेत.

३ नाशिक संमेलनांतील ठरावान्वये यंदाच्या वाङ्मयसंमेलनासाठी 'अितिहास' हा विषय चर्चेसाठी ठेविला असून हें संमेलन ता. १ व २ जून दिवशीं रा. ब. गो. स. सरदेसाई यांच्या अध्यक्षतेखाली भरेल. या संमेलनाचें स्वरूप खाली दिलेल्या प्रसिद्धिपत्रकावरून सभासदांच्या लक्ष्यांत येअीलच.

परिषदेच्या वरील सभा, वाङ्मयसंमेलन यांस सभासदांनी अगत्य अुपस्थित राहून व सूचना, चर्चा करून कार्यास साहाय्य करावें अशी विनंती आहे.

चिटणीस, म. सा. परिषद्

---

प्रसिद्धिपत्रक १

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

### वाङ्मयसंमेलन अधिवेशन पहिलें

नाशिक येथे भरलेल्या २६ व्या महाराष्ट्र साहित्य संमेलनांतील ठराव ८ यास अनुसरून महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे या वर्षी पुणें येथे ता. १ व २ जून दिवशीं अेक वाङ्मयसंमेलन भरविण्याची योजना परिषदेच्या कार्यकारी मंडळानें निश्चित केली आहे.

संमेलनांत चर्चेसाठी 'अितिहास' हा विषय मुकर करण्यांत आलेला असून या विषयाच्या साहित्यिक अंगांवर सांगोपांग चर्चा व्हावी हा या संमेलनाचा अुद्देश आहे. शास्त्र आणि संशोधन या दृष्टींनी अितिहासाकडे पाहण्याचें कार्य भारत अितिहास संशोधक मंडळासारख्या त्याच कार्याला वाहिलेल्या संस्थांचें असल्यामुळे साहित्य परिषदेचा या क्षेत्रावर अतिक्रमण करण्याचा हेतु व अुद्देश नाही हें प्रथमच स्पष्ट करणें आवश्यक आहे. साहित्याचें अेक अंग या दृष्टीने ही सभा अितिहास या विषयाकडे पाहणार असल्यामुळे (१) अितिहास व ललितवाङ्मय (काव्य, कादंबरी, नाटक, चित्रपट), (२) अितिहास व शैक्षणिक अभ्यासक्रम, आणि (३) अितिहास व लोकशिक्षण या तीन विषयांवर विस्तृत चर्चा व्हावी अशी योजना आहे; व म्हणून या विभागांतील चर्चेचा अुपक्रम करण्यासाठी (१) १ श्री. न. चिं. केळकर, २ प्रा. न. र. फाटक, ३ श्री. गो. गो. मुजुमदार (साधुदास), ४ श्री. भालजी पेंढरकर; (२) १ श्री. वि. द. घाटे, २ प्रा. द. वा. पोतदार, ३ प्रा. रा वि. ओतुरकर, (३) १ प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर, २ प्रा. श्री. व्यं. पुणतांबेकर, ३ डॉ. अ. स. अळतेकर या अधिकारी विद्वानांना विनंती करण्यांत आली आहे. संमेलनाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याविषयी रा. ब. गो. स. सरदेसाअी यांना विनंती करण्यांत आली असून ती त्यांनी कृपेने मान्य केली आहे.

तरी या विषयाबद्दल जिव्हाळा व अगत्य असलेल्या सर्वांना विनंती की त्यांनी आपल्या अेतद्विषयक सूचना कार्यकारी मंडळाकडे पाठवाव्या व चर्चेत भाग घेऊन ती सर्वांगीण व अधिकृत स्वरूपाची करण्यास मदत करावी.

| | |
|---|---|
| वा. म. जोशी, स्वागताध्यक्ष | के. नारायण काळे } चिटणीस, |
| र. पु. जोशी, कार्याध्यक्ष | वा. द्दा. गोखले } म. सा. परिषद् |

ता. १९-४-४३

## पत्रिकेच्या मागील अंकांची सवलतीची किंमत

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे गेल्या १५ वर्षांचे (१० वें वर्ष सोडून) संच सवलतीच्या दरानें द्यावयाचे कार्यकारी मंडळाने ठरविलें आहे. वरील सर्व संच अेकदम घेणाऱ्यास प्रत्येक संच केवळ आठ आणे किंमतीस मिळेल. किरकोळ संचाची किंमत प्रत्येकीं बारा आणे आहे. १० व्या वर्षाच्या संचाच्या थोड्याच प्रती शिल्लक असल्याने या संचास रु. तीन पडतील. पाठविण्याचा खर्च वेगळा पडेल. पत्रिकेचे हे संच वाचनालयें, विद्यालयें-महाविद्यालयें, मराठी भाषाभ्यासी अित्यादिकांस अत्यंत अुपयुक्त असेच आहेत.

## मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अितिहास
### महानुभावअखेर

लेखक—कै. बाळकृष्ण अनंत भिडे, आकार—रॉयल अष्टपत्री. पृष्ठें—१२५. अुत्तम बांधणी. किंमत फक्त दीड रुपया. परिषदेच्या सभासदांस रु. १-२-० ट. ख. वेगळा.

विशेष माहितीसाठी लिहा:—

चिटणीस,
म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



वर्ष १६ वें ]

## अनुक्रमणिका

[ अंक २ रा

(अंक ६६)



---

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## झोपाळू चीन*

ऐसा पहुडे विराट देह चीनचा—
पहुडे निद्रिस्त गाढ, चेतनहीन,
शतकांवरि शतक जरी येउन गेलें,
वैचारिक आंदोलन विविध रंगलें,
अन् कलिनें जरि दिधलें हृदयीं ठाण
तरि निजलें मंदसंज्ञ हें "विभु"राष्ट्र !

दूर दूर वाहतात नदनदीजलें
स्वैर पूर पसरतात तीरावरती;
जरि रुधिरां बधिरवुनी नसनसांतली
रोधुनियां गति झाली स्तब्ध, तरीही
हा अजुनी निद्रेमधि !— मध्ययुगींच्या
अंधाऱ्या निशेंतील अजुनि नशा ती
गेली नच पार; मनीं दृढ विश्वास
वसतो तैसाच अजुनि की, वीर्य महान्,
'अति उदात्त संस्कृति, जीं अमर राहिलीं
'युगयुगिंच्या झगड्यांतुन, तीं मर्त्य कशीं ?
'परमथोर मुनिसत्तम मनु-कान्फुत्से[1]
'स्मृति सांगे "जीवनिंच्या व्यवहाराची"
'पाळितसूं ती सदैव ! मग कोण अम्हा
'डिवचण्यास हो समर्थ ? अन् सभोंवती
'भक्कम अतिरुंद भिंत, आश्चर्यच तें
'विश्वांतिल एक; तिथे हृदय शत्रुचें
'हादरून हो दुभंग ! अन् कोण वरें
'नद विशाल, दृढ जंगल, पार उतरुनी
'हृदयावरि घाव घालण्यास धजुं शके ?
'तो चेंगिझ, तो कुबला खान-अमीर
'आले अन् गेले ! परि मी नांदतसें—
'मी अनादि अन् अनंत, मी अविनाशी !'

स्वप्नांतिल हे तरंग, स्वप्नाळूंचे
टाकितसे चंडकिरण सुन्-यत्-सेन
थरथरून नवयुगिंच्या त्या प्रबोधनीं—
'उठ जीव ! सोड करुण हा व्यामोह;
'अवघें हें मानवीय विश्व वाहतें
'हाकारा करित, पिटित बघ डांगोरा !
'विश्वाच्या जत्रेमधि बघ नवीं नवीं
'उघडतात जादूचीं भव्य दालनें;
'सृष्टीचें अंतरंग जाणण्या पुरें
'अहोरात्र यत्न करी विज्ञान, पहा !
'मानवीय सृष्टिमधे ये विशालता;
'राष्ट्र-जीवनीं ध्येयीं परिवर्तन हो !
'एकावटण्यास सर्व मानवजाती
'करि प्रयत्न ! परि तूं तर अजुन नशेंत !
'उत्तिष्ठत, जाग्रत, भो चीनयुवक हो !'

ऐकियली द्रष्ट्याची हाक तयानें;
किंचित् ये जाग सुस्त चीनमनाला;
परि अजुनी झोपेची झापड नयनीं
गुंगीचें अंजन हळु पुनरपि घाली—
— साखरडुलकींत पहाटेस सुवशा
झुंजूमंजू तरळे स्वप्न गुलाबी;
तैं व्हावा गांवमंदिरांत चौघडा,
मंदधीर पडघम-पडसाद घुमावा
निद्रेंतच कानांमधि; जाग हळू ये;
अन् पुनरपि शय्येवरि कलवुन बाजू
अर्धस्फुट सुस्तींतच गुंगी येते—
तीच स्थिति अनुभवितो राष्ट्रपुरुष हा !!

**ना. ग. जोशी**

* "विश्वमानव" नामक अप्रकाशित लघु-काव्यसंग्रहापैकी एकांतील उतारा. वृत्त : वैनायक.

१ Confucius— चीनचा जुना धर्मशास्त्रज्ञ स्मृतिकार, 'Conduct of Life'चा कर्ता.

# कवीच्या अंतरंगांत*—१

( लेखक : प्रा. शं. के. कानेटकर, अेम्. अे. )

मित्र हो,

दुसऱ्याच्या कवितेवर निर्भयपणाने बोलतां येतें, पण स्वतःच्या कवितेवर स्वतःच बोलतांना आपलें काय होतें तें सांगतां येत नाही ! मन अस्वस्थ होतें नि कांहीतरीच वाटतें ! थोडें कमी बोलावें तर तें अपुरें पडतें, थोडें अधिक बोलावें तर त्यांत फाजील स्तुतीचा दोष घडतो. या दोहोंमधला समतोलपणा साधणें कठीण आहे.

पण अेका दृष्टीने आपल्या कवितेवर आपण बोलणें हें फायद्याचेंहि असतें. विशेषतः तुमच्यासारख्या रसिकांशीं बोलतांना तरी तें खास फायद्याचें असतें. कारण आपल्याला अेखादा विषय कसा सुचला, त्याने आपल्या मनाची पकड कशी घेतली, त्यावर आपण काव्यसंस्कार कसे केले आणि शेवटीं त्याचें भावलेखन कसें झालें, हें सांगतांना आपल्याला आनंद वाटतो नि रसिकाला अेक प्रकारची मौज वाटते.

आपली कविता हें आपण पाहिलेल्या, कल्पिलेल्या वा चिंतन केलेल्या विचारांचें भावनेंतून अुमळलेलें शब्दचित्र असतें. कवीचें अंतःकरण हें अेखाद्या छायाचित्रें घेणाऱ्या बिंबग्राहक कांचेसारखें असतें. कान व डोळे हे त्याचीं 'लेन्सें' असतात. यांपैकी कोणत्याहि लेन्सवर कांहीअेक विशिष्ट दाब पडला कीं तें आपोआप अुघडतें व आंतील कांचेवर त्याचें छायाचित्र अुठतें. नंतर छायाचित्राची कांच जशी अंधारांत तांबड्या प्रकाशांत धुवायची असते तसेंच याहि कांचेचें असतें. तिच्यावर अेकान्तांत कांही संस्कार करायचे असतात. यांतूनच आपलें काव्य तालबद्ध होअून छंदोमय वाणीने बाहेर पडतें. याची थोडीशी कल्पना मी माझ्या कांचनगंगेतील 'कवितेचा जन्म' या कवितेंत व फलभारांतील 'रसिक संशयग्रस्ता' या कवितेंत दिली आहे. दोहोंत फरक अितकाच की, पहिलींत सर्व कांही सरळ सांगितलें आहे, नि दुसरींत तेंच जरा वक्रोक्तीने सांगितलें आहे. दुसरींतील कथा अशी:— अेका कविराजांच्या पत्नीने आपल्या पतीचीं प्रेमविषयक अनेक सुंदर गीतें वाचलीं. त्यांतील प्रेमाचीं विविध चित्रें पाहून तिचें मन क्षणभर गोंधळलें. त्यांत 'काव्य हें अनुभवाखेरीज जन्माला येत नाही' असेंहि अेक वाक्य तिने त्यांच्या तोंडून अैकलें होतें. तेव्हा संशयग्रस्त होअून ती विचारते—

सुरेख रम्य लिहीतां कशी तरी कविता ?
कसें अुचंबळवीतां जळास, अैकवितां ?

पोटांत संशय नि ओठांत रसिकता ठेवून संशयनिरास करून घेण्याचा ती प्रयत्न करते; म्हणून तो अुत्तर द्यायला जातो. तों तीच त्याला थांबवित व म्हणते—

---

* 'In the Poet's Parlour' या मुंबअी ऑल अिंडिया रेडिओच्या मालेंत नभोवाणीवरून दि. ३०-३-४३ रोजीं केलेलें हें भाषण त्यांच्या परवानगीने पत्रिकेंत प्रकाशित होत आहे.

कशास आज वहाणे ! परांतरीं शिरतां
न्यहाळितां, मग तेथें हळूहळू रमतां.
रमून तेथ कधीं का अुगाच बैसतसां,
मिळेल तें परवान्याविणें क्षणीं लुटतां !

'आणि या लुटींतूनच तुम्ही आपलीं काव्यें घडवितां. तुम्हांला कुणीतरी यक्षिणी वनिता खास वश आहे. मला फसवलंत, पण लोकांना तरी फसवूं नका !'

हे सर्व अवखळारोप लक्षांत घेअूनहि पति तिचें सर्व म्हणणें मान्य करतो नि "परांतरीं शिरलें चित्त, त्यास काय करूं" असें अुलट तिलाच विचारतो. ती 'पर' म्हणजे 'परकी व्यक्ति' 'स्त्री' असें समजते व तो 'पर' म्हणजे 'श्रेष्ठ', 'अुदात्त' असें समजतो व शेवटपर्यंत तिला संभ्रमांत टेवून आपण त्यांत कसे रमतों याचें वर्णन करीत जातो. शेवटीं "हे विविध अनुभव देणारी व्यक्ति कोण आहे ठाअूक आहे का ? तिचा फोटो तुला पाहायचा आहे का" असें विचारतो नि झटकन् शेजारीं पडलेला आरसा तिच्यापुढे धरतो. ती लज्जित होते नि कवितेला आणखी अेक विषय मिळाला म्हणून तो आनंदित होतो. आपल्या भोवतालच्या परिस्थितींतून आपण आपली काव्यवस्तु कशी अुचलतों हें या भावार्थावरून तुम्हांला खात्रीने समजेल.

पण कधी कधी काव्याला विषय अेखाद्या विलक्षण टिकाणीं देखील मिळतो. आपली काव्यवस्तु आपणांस कुठे, कशी नि केव्हा सांपडेल हें सांगतां येणार नाही. माझी 'तेढ' कविता ही याचें अुत्तम अुदाहरण आहे. 'तेढ' हें पतिपत्नींतील प्रेमकलहानंतर अुत्पन्न झालेल्या रुसव्याचें शब्दचित्र आहे. रुसव्याने अबोला निर्माण झाला व तो दीर्घकाल टिकला. पण भेट-बोलण्याची हुरहूर प्रत्येकालाच लागली होती. अशा स्थितींत प्रणयिनी म्हणते—

"किती पाहूं वाट तुझी लागे जीवा वेड, बाअी .
अजूनी का नाही गेली अंतरींची तेढ, बाअी !"

अशी काकुळतीची विनवणी करून ही अबोल्याची शिक्षा पुरी झाली हें सांगतांना ती म्हणते—

घाव लागे तूज आणि झालें मी घायाळ, बाअी
आसवांनीं भडके हा पेटलेला जाळ, बाअी.

आणि पुढे दिलरुब्याचे गोड शब्द कधी अेकूं येतील अशी अुत्कंठापूर्ण आशा प्रकट करते. कविता प्रथम व द्वितीयपुरुषी सर्वनामांत लिहिली असल्यामुळे वाचकाला हा प्रेमकलह कवि व कविपत्नी यांच्यामधला आहे असें वाटेल. पण मूळ प्रसंग कल्पनाहि होणार नाही असा आहे.

अेकदा माझ्या हाताखालच्या अेका वृद्ध शिक्षकांनी आपल्या कामांत अेक अक्षम्य चूक केली. त्याबद्दल अधिकारी या नात्याने मला त्यांना थोडें बोलावें लागलें. त्यांनी आपली चूक कबूल केली, पण लगेच त्यांच्या डोळ्यांत पाणी आलेलें मला दिसलें. तें पाहून मला फार वाअीट वाटलें व माझ्या मनांत आलें की 'हीच चूक मला गोड शब्दांनीहि त्यांच्या नजरेस आणतां आली असती; अुगाच मीं कडक बोलून त्यांच्या मनावर घाव घातला. म्हणजे, घाव त्यांना बसला व त्याच्या वेदना माझ्या मनाला झाल्या ! आणि थोड्या वेळाने माझ्या मनांत 'घाव लागे तूज आणि झालों मीं घायाळ !' ही ओळ तयार झाली. कवितानिर्मितीच्या या पूर्वसूचनेने तींमधील पात्रें, प्रसंग नि घटना निश्चित केल्या, त्यांवर विद्युद्वेगाने कांही संस्कार झाले व भिरभिरलेल्या मनांतून मग 'तेढ' कविता अवतरली. मिळालेल्या प्रसंगाचें मानस-

शास्त्र कवीला नीट वापरतां आलें पाहिजे व त्याचा मानवी जीवनाशीं चपखल संबंध घालतां आला पाहिजे हेंच माझ्या मतें यांतील रहस्य आहे. याच कवितेची आणखी अेक गंमत आहे. अेक दिवस ही कविता, माझ्या दृढपरिचयाच्या अेका श्रीमंत जहागीरदारीणबाओींना मीं सहज म्हणून दाखविल्यावर, त्यांनी मला प्रश्न केला— "म्हणजे! आमचें भांडण झालेलं तुम्हांला कसं कळलं?" कवितेचा अुगम व्यक्तीच्या भावनेंतून झाला असला तरी तिने लौकिकजीवनाशीं समरस झालें पाहिजे या मूलभूत तत्त्वाचें हें प्रत्यंतरच नव्हतें का?

कांचनगंगेंतील 'भेटीनंतर' व 'सरस्वती' हीं दोन सुनीतें प्रेमाने भेटीसाठी आतुर झालेल्या पण भेट होतांच मन विरसून जाणाऱ्या प्रेमिकांच्या मनोवृत्तीवर लिहलेलीं आहेत. पण त्यांतील— "येण्याच्या तव कल्पनेंत भरली जी गोड काव्यात्मता। तूं आल्यावर हाय आटुन कशी ती जाय वेगें झरी" ही मूलभूत कल्पना मला मे महिन्यांत येणाऱ्या सुट्टीवरून सुचली होती.

प्रत्येक कवितेच्या मागे कांही तरी घटना, कांही प्रसंग, अनुभव असतात. (हे सारे कळण्याची आवश्यकता असते असें नाही; पण ते कळले तर कवितेच्या कलात्मकतेवर प्रकाश पडून आपल्या आनंदांत भर पडल्यावांचून राहत नाही. याचा अर्थ अितकाच की सृष्टींत प्रत्यहीं घडणाऱ्या संघर्षांतून आपण नेमकें सत्य कसें अुचलायचें, त्याला मानवी जीवनाशीं निगडित करून सौंदर्यरूप कसें द्यायचें किंवा त्याचें असलेलें सौंदर्य वाचकांना प्रतीत कसें करून द्यावयाचें हें लेखकाला अुत्तम कळलें पाहिजे.

आपल्याला हे विषय जसे सहज मिळतात, तसेंच आपण दुसऱ्यांनी दिलेल्या विषयावरहि कधी कधी लिहितों व त्यांतूनहि केव्हा केव्हा चांगल्या कविता निर्माण होतात. माझी 'शूर्पणखा' ही कविता याचेंच अुदाहरण आहे. निरनिराळ्या आधुनिक कवींकडून अेक 'गीतरामायण' लिहून घ्यायची कल्पना असलेल्या बेळगांवच्या श्री. कुलकर्णी नांवाच्या गृहस्थांनी मला 'शूर्पणखा' व 'मुद्रिका' हे दोन विषय दिले होते. त्यांच्या अिच्छेचा विषय व माझ्या अिच्छेची जाति व जुळणी यांचें मीलन होअून मीं दोन्ही कविता लिहल्या; पण त्यांपैकी 'शूर्पणखा' हीच कविता यशस्वी ठरली. फलटण संस्थानच्या सुविद्य नि रसिक राणीसाहेब श्रीमंत सौ. लक्ष्मीदेवी यांनी मला 'ज्ञानेश्वर' व 'ज्ञानेश्वरांचें औक्षण' हे दोन विषय मला दिले होते. त्यावर लिहिलेल्या दोन्ही कविता यशस्वी झाल्या असल्याचें टीकाकारांनी नमूद केलें आहे. 'फलभारां'तील या कविता वाचल्यास वाचकांना प्रत्यय येअील. कवितेचें समर्पक भावलेखन हेंच तिच्या यशस्वितेचें खरें रहस्य आहे. त्यासाठी काव्यविषयाने आपल्या भावनेस हेलकावा देअून आपलें मन सर्वस्वीं वेधून टाकलें पाहिजे व आपणहि भावसर्वस्वाने त्याच्याशीं समरस झालें पाहिजे. तरच सत्काव्य निर्माण होण्याची शक्यता असते.

आपण भावगीतें केव्हा लिहितों नि नाट्यगीतें केव्हा लिहितों हा प्रश्नहि मौजेचा आहे. ज्या भावनेचा संबंध आपल्या जीवनसर्वस्वाशीं असतो व जी आपलें सर्व अंतर्जीवन व्यापून टाकते तींतून आत्मनिष्ठ कविता म्हणजे भावगीत निर्माण होतें. परनिष्ठ भावनेंत आत्मीयता असली तरी तीमधील पुष्कळसा भाग आपण तिऱ्हाअीतपणें पण सहानुभूतीने पाहत असतों. तथापि आत्मनिष्ठतेचे व परनिष्ठतेचे धागे आपल्या हळुवार अंतःकरणांत कसे गुंतलेले असतात हें अुकलून दाखविणें कठिण आहे. माझी 'कृतज्ञता' व 'आअीचा आशीर्वाद' हीं दोन्ही नाट्यगीतेंच! पण 'कृतज्ञते'चा विषय सर्वस्वीं परका तर 'आअीचा आशीर्वाद' हा विषय सर्वस्वीं आत्मनिष्ठ. मला १९२५ मधील सप्टेंबरची ती पंचवीस तारीख अजून आठवते

आहे. संध्याकाळचे सात वाजले होते व माझे अेक डॉक्टर मित्र मजकडे सहज आले होते. बोलण्यावरून बोलणें निघतां निघतां त्यांनी आपल्या अिस्पितळांत नुकतीच घडलेली अेका मुलाची अेक करुणकथा मला सहज सांगितली. माझें मन त्या कथेने भारावलें नि अस्वस्थ झालें. डॉक्टर निघून गेले तरी मी त्याच कथेवर तरळत होतों. ते गेले नि अर्ध्यांच तासाच्या आंत माझी 'कृतज्ञता' कविता मीं अेकटाकी लिहली ! "शुभमंगल मंगल सावधान सावधान । बोलतें मी आअी जाण" या आअीच्या आशीर्वादांतील आअी म्हणजे साक्षात् माझी दिवंगत झालेली धाकटी बहीण होय व आशीर्वाद देणारी वधू म्हणजे माझी भाची 'कमल' ही होय. या दोन्ही कवितांत आपपरभाव असूनहि, त्या दोनहि नाट्यगीताच्या स्वरूपांत अवतरल्या आहेत. माझ्या 'फुलवेल', 'भेटवस्तु परत आल्यावर' किंवा 'चांदण्यांतील भेट' या कवितांतील विषय परनिष्ठ असूनहि मीं ते आत्मवृत्तपर चित्रित केले आहेत. म्हणजे आत्मनिष्ठपर कविता ही आत्मनिष्ठ असली किंवा परनिष्ठ ही परनिष्ठ असली तरी याहून निराळी परिस्थिति असूं शकणारच नाही असें मात्र नाही. मूळ विषय कलेसाठी कसा वळवून घ्यायचा यांतच खरी कला आहे. कलेची ही कुसर ज्याला माहीत असते तोच कवितेतील खरा रस चाखून आनंद पावतो.

छंदःशास्त्राच्या क्षेत्रांतहि मी कांही नम्र प्रयोग केले आहेत. जुन्या जातींचें पुनः-संस्करण करणें, नवीन जाती निर्माण करणें व त्यांना अर्थवाहक वा भाववाहक चाली देणें यांसारख्या अल्पस्वल्प गोष्टींचीं चारदोन अुदाहरणें तुम्हांला मनोरंजक खास वाटतील. माझी 'सारंगीवाला' ही कविता— म्हणजे तिची 'मनमोहन' ही जाति मराठींत सर्वस्वीं नवीन आहे. संगीताचें गुरुमुखच अिथे मला अुपयोगी पडलें. लहानपणीं शिकलेल्या चिजा, चाली, पदें, सुरावटी मनाशीं वरचेवर घोळून पाहून, त्यांतून अेखादी नवीन चाल निर्माण करावयाची हा माझ्या मनाचा अेक आवडता चाळा आहे. गुरुजींनी मला अेक ठुमरी शिकविली होती. ती अशी होती—

'जरा ठाडे रहो बय्या चलोंगी तोरे साथ'

यांतून मीं माझी 'मनमोहन' जाति निर्माण केली. त्याचप्रमाणे दुसऱ्या अेका ठुंबरींतून "तुझ्यावीण अंतरींची प्रतिमा फुलेना" हा 'स्मर छंद' निर्माण झाला. "मज चैन नसे ग कशि मी विसरूं मना !" ही माझ्या 'विरहिणी' कवितेची 'बालमुकुंद' जाति व "तुझी मुरली मधुर, मुकुंदा ! मज अैकुं दे जरा" ही 'शुद्ध मनमोहन' जाति म्हणजे जुन्या 'तुझ्या बालमुकुंदें आजि बाजि दैना केली" व "मशिं बोलुं नको रे गोविंदा मला आला तुझा राग" या छंदःप्राय जातींचें पुनःसंस्करण करून घडविलेलें शुद्ध रूप होय. यांच्या चाली मला माझ्या पत्नीकडून व तिच्या बहिणीकडून मिळाल्या. माझे मित्र माधवराव पटवर्धन यांच्या "संगमोत्सुक डोहा"चें ध्वनिमुद्रण श्री. गोविंदराव जोशी यांनी केलें आहे. त्या भावगीताची स्वरजुळणी मींच केली आहे. तांब्यांची 'मुद्रिका' जातींतील 'तूं हुबेहूब साअुली' ही कविता अैकल्यावर त्या जातीला 'अंतरे' घातल्यास तिची अेक निराळीच खुलावट होअील असें मला वाटलें व तो प्रयोग मीं 'वियोगिनीचें पुण्यस्मरण' ही कविता लिहितांना प्रथम करून पाहिला; व तो यशस्वी झाला. वृत्तदृष्ट्या असे बारीक बारीक अनेक प्रयोग केल्याचीं अुदाहरणें मला देतां येतील. पण तें हें स्थळ नव्हे. माझ्या प्रयोगाचा अनेकांनी पुरस्कार केला व छंदोरचनाकार माधवरावांनी त्यांची छंदोरचनेंत दखल घेतली हें पाहून मला आनंद झाला.

माझ्या लिखाणावर साधकबाधक अनेक टीका झालेल्या आहेत. माझीं भावगीतें

माझ्या अभंगांअितकीं अुत्कृष्ट नाहींत असाहि अेक मजवर आक्षेप आहे. कदाचित् हें खरें असेल ! पण माझे अभंग हे अेका विशिष्ट वृत्तीचे द्योतक असून ते सर्वस्वीं आत्मवृत्तपर आहेत व त्यांत मीं माझ्या भावनेला नियंत्रण घातलेलें नाही. माझ्या भावगीतांतील भावना संयमित आहेत असें माझें नम्र समर्थन आहे. शिवाय मीं दुःखापेक्षा सुखाची भावनाच अधिक रेखाटली आहे. त्यामुळे कदाचित् वाचकांना तिचा पुनःप्रत्यय घडत नसेल ! पण हा युक्तिवाद आहे. खरें म्हणजे भावी कालच त्यांचें खरें स्वरूप निश्चित करणार आहे.

माझ्या खंडकाव्यावर अुत्तम व अधम टीका झालेल्या आहेत. पण त्यांच्या लोकप्रियतेची साक्ष मला आलेल्या अनेक पत्रांवरून देतां येअील. पण तें त्यांच्या चिरकालत्वाचें गमक मी समजत नाहीं. तथापि त्यांचा अनेक टीकाकारांनी गौरव केला हें खरें आहे. 'आंबराअी' काव्य कवित्रयं तांब्यांना अतिशय रसाळ वाटलें व अेका प्राध्यापकाला त्याचा आस्वाद घेतांना ओकारी आली, यांतील सार तुमच्यासारख्या रसिकांनी काढावयाचें आहे. स्वतंत्र काव्याअितकेंच भाषान्तराचेंहि मला महत्त्व वाटतें; पण तें माझ्या पुढील 'अनिकेत' या खंडकाव्याच्या प्रकाशनाच्या वेळीं मी तुमच्यापुढे मांडीन. 'अनिकेत' हें टेनिसन्च्या 'अिनॉक् आर्डन्'चें शुद्ध भाषान्तर आहे. त्यासंबंधी आताच बोलणें बरें नव्हे.

कवीचें व्यक्तिमत्व व मन हीं कळल्यावर त्याचें काव्य चांगलें कळतें असें मला वाटतें. त्यासाठी टीकाकाराने कवीच्या जीवनाचा, त्याच्या अंगोपांगांचा व त्याने आपल्या भोवतीं निर्माण केलेल्या वातावरणाच्या परिसराचा सखोल नि संपूर्ण अभ्यास केला पाहिजे. त्यासाठी त्याला शक्य असल्यास कवीच्या सहवासांत, सांनिध्यांत निदान खोलीशीं तरी वावरलें पाहिजे. असा अभ्यास होअून "The Mind of Keats" किंवा "Ariel" यांसारखीं पुस्तकें मराठींत झालीं पाहिजेत. त्यानेच कवीचें नेमकें स्थान निश्चित होण्यास मदत होअील. मग आपलें स्थान वर वा खाली कुठेहि निश्चित झालें तरी त्यांत कवीला वाअीट वाटण्याचें कारण काय ?

## कवीच्या अंतरंगांत* — २

(लेखक : श्री. यशवन्त दिनकर पेण्ढरकर)

कोण आहे दारांत ? अितकं काय निरीक्षण चाललंय खोलीचं ? कवीची खोली अशी काय प्रेक्षणीय असणार ? बाळकराम किंवा कॅ. लिमये यांचे विनोदी लेख वाचून कांही विचित्र कल्पना तर करून घेअून नाही ना आलांत ? मोरोपंताने तर आपल्या खोलीच्या सगळ्या भिंतींवर म्हणे यमकेंच यमकें लिहून ठेविलीं होतीं. तसा प्रकार सांप्रतच्या कोणा कवीच्या खोलींत आढळेल असें मला नाही वाटत. थोड्या वर्षांपूर्वी तर यमकाविरुद्धच जारीने प्रचार झाला. पण त्यानंतर गेय कवितांचे– कवितागायनाचे– दिवस आले. गेय कवितेला यमकाशिवाय गोडी नाही. तथापि आजकालचे कवि यमकासाठी तितकासा आटापिटा करणार नाहीत. अेक अक्षर आणि फार तर अुपान्त्य स्वर यांनी त्यांचा यमकापुरता कार्यभाग होतो. मग चालला-भागला, येअी-नेअी, देतां-घेतां असलीं व्याकरणीय स्वरूपसाम्यें वापरण्यांतहि त्यांना अुणेपणा वाटणार नाही. माझ्याबद्दल विचाराल तर, कवितांतर्गत अुन्मेषानुसार नियमक कविता लिहिण्यांतहि मी अभिमान मानणारा असलों तरी यमकाविषयी आस्था बाळगणारांपैकी मी आहें. आणि अनेक

* ता. ९ मार्च १९४३ रोजीं मुंबअी नभोवाणी केंद्रावर केलेलें भाषण केंद्रप्रमुखाच्या परवानगीने.

अक्षरांचें मोरोपंती यमक साधण्याचा माझा हव्यास नसला तरी केवळ चालला-मागला-तापला अशा यमकांवर गुजराण करणें मला लाजिरवाणें वाटतें.

'यशोधन'मधील 'समर्थांच्या पायांशीं' व 'मांडवी' ह्या कविता तुम्हांला माहीत असतील. त्यांच्या ध्रुवपदांतील अन्त्य शब्द 'संदुका' आणि 'संदेश' हे आहेत. या शब्दांचीं यमकें त्या दीर्घ कवितांतून शेवटपर्यंत, अर्थाला दुबळेपणा किंवा नकलीपणा न येऊं देतां, सफाईनें साधलीं आहेत. तशाच त्या 'मृत्यूस' आणि 'अखेरचें मागणें' ह्या कविता. ऐकींत 'तूं'चें आणि दुसरींत 'मी'चें,— हीं यमकें किरकोळ नव्हेत. व्यवहारांत हमरीतुमरीवर कोणीहि सहज येईल. पण यमकांत 'तूं-मी'ची लांबण लावणें म्हणजे कसोटीचीच वेळ !

'अखेरचें मागणें' ह्या कवितेच्या वेळीं तर आणखी ऐक विशेष प्रयोग झाला. ही कविता मुद्रिका जातींत आहे. ही जाति नुसत्या कथनात्मक (Narrative) विषयाला साजेशी. पण माझा विषय तर मध्यवर्ती कल्पनेच्या भावनोद्गारामोंवतीं फिरफिरून रुंजी घालण्याजोगा. अखेर, मूळ प्रचलित गीताची घडण बदलून ध्रुवपद आणि कडवें (म्हणजे अंतरा) अशी तिला जोड दिली व तो भाव (Mood) फुलविला. मोत्यांच्या ऐकदाणीचीं फुलें घडवून तीं माळेंत ओंवलीं असेंच म्हणा ना !

'यशोगंधां'तलें 'येसि कशाला दारीं' हें कवन अशाच प्रकारचा ऐक उल्लेखनीय नमुना आहे. मूळची चाल अशीः—

दूती नसे ही माला। सवतचि भासे मला<br>
नच ऐकान्तीं। सोडी नाथा<br>
भेटूं न दे हृदयाला। सवतचि भासे मला.

ह्यांतील 'दूती नसे ही माला। सवतचि भासे मला' हें ध्रुवपद आणि 'नच ऐकान्तीं सोडी नाथा॥ भेटूं न दे हृदयाला' इतकें कडवें झालें कीं लगेच 'सवतचि भासे मला' हें ध्रुवपद. आता माझी कविता जेव्हा ही चाल घेऊन अवतरली— हो, कविता आपली चाल घेऊनच बहुशः अवतरते. विषय आधी सुचतो आणि मग त्याला अनुरूप अशी चाल निवडायची असलें वधूसंशोधन भावगीताच्या जीवितांत तरी सहसा घडत नाहीं; जन्माआधीच वाङ्‌निश्चय झालेला असतो.—तेव्हा ह्या चालींतलें कडवें अगदी तोकडें आहे ऐखादी कल्पना नीट बसवायला. तेव्हा 'भेटूं न दे हृदयाला' ह्या चरणापाठोपाठ ध्रुवपदाकडे धाव घेण्यापूर्वी त्याच्याच मापाचा आणखी ऐक चरण घातला. त्यामुळे ध्रुवपदाशीं सम्मीलित व्हायला प्रत्येक कडव्याअखेरचा ऐक शब्द यमकासाठी जिथे पुरला असता तिथे दोन शब्दांची जबाबदारी ओढवून घेतली. तें असेंः—

येसि कशाला दारीं। ऐसा ऐन दुपारीं ?<br>
देतां भाकर। करिसि पुढें कर<br>
पडतें गळुन विचारीं।

ऐवढ्याने मूळ चालीबरहुकूम कडवें संपल्यावर 'येसि कशाला दारीं' ह्या ध्रुवपदावर न उतरतां 'कसल्या श्रमसि विचारीं' हा चरण अधिक घेतला. आणि अशा रीतीने बाराऐवजी चोवीस वेळां 'री' ओढली. 'ट'ला 'ट'। 'री' ला 'री'॥ अशी यमक्या कवीची टवाळी करतां आली तरी कवितेचा भावार्थसौंदर्ययुक्त आकार पायरवूं न देतां यमक साधणें हें भाषासमृद्धीचें लक्षण खास आहे. याच कवितेंत मूळ चालींत नसलेलें आणखी ऐक यमक मीं

जास्त घातलें. 'नच अेकांतीं । सोडी नाथा' हे यमकविरहित चरण आहेत; तर मीं त्यांच्या जागीं सयमक रचना केली. 'देतां भाकर । करिसि पुढें कर', 'बघसी अितुका । मज रोखून का?' अशासारखीं अेक दोन शब्दांआड यमकें साधत जाणें हें कमी अवघड नाही. मोरोपंतांचें यमक अेक-अेक आर्येपुरतें; तर आधुनिक कवींच्या गीतांत अेकच अेक यमक शेवटपर्यंत साधायचें असतें. असो.

बाह्य सजावटीबद्दल अशा किती तरी खाचाखोचा सांगाव्या लागतील. काव्याच्या मूल्यमापनांत बाह्य सजावटीला प्राधान्य देणेंहि तितकेंसें शिष्टसंमत नाही. बाह्यांग अंतरंगाच्या मानाने दुय्यम मानतात. पण बाह्यांग आणि अंतरंग ह्याबद्दलचें हें म्हणणें खरें असलें तरी ह्या अुभयतांचा कांहींच लागाबांधा नाही—त्यांच्यांत संपूर्णपणें फारकत असते—असें नाही. ललनेच्या सौन्दर्याला यथोचित वेषभूषेची जोड मिळाली तर तें अधिक खुलून दिसतें आणि मुमुक्षूचें सौंदर्य त्याच्या निःसंगपणांत, त्यागबुद्धींत, अनासक्तींत आहे. हृदयावर नुसती रत्नमाला (राम नसलेली रत्नमाला) धारण करण्यापेक्षा हृदयांत राममूर्ति कोरून ठेवणें हनुमंताला भूषणावह असलें तरी त्याच्या हातांत कमलनालापेक्षा गदाच असणें सुसंगत होय आणि सरस्वतीने हातांत वीणा धारण केली आहे असें दाखवणें हें तिच्या अन्तःसंगीताचें निदर्शकच होय. सारांश, प्रत्येक वस्तूचें सौन्दर्य कशांत ना कशांत सामावलेलें असतें आणि तेंहि अंतरंगाचाच अेक आविष्कार होय.

माझ्या 'जयमंगला' काव्याबद्दल असेंच मला सांगतां येअील. त्या काव्याला सर्वसामान्य लोकप्रियता लाभली नसावी असा माझा ग्रह आहे. सामान्य जनतेचें अेक असो, पण खऱ्या रसिकांना तरी तें कितपत आवडलें, म्हणजे तो प्रयोग कितपत पसंत पडला, हेंहि कळायला मार्ग नाही. कारण, नवीन प्रयोगाबद्दल सहानुभूतियुक्त जिज्ञासा बाळगून आपली पसंती अनाहूतपणें व्यक्त करण्याअितकी मराठींतील शिष्ट रसिकता जागरूक नसते असा माझा अनुभव आहे. बन्दीशाळेंत अेक कथा पद्यांत सांगितल्यावर दुसरी कथा सांगतांना तीच निवेदनपद्धति पुन्हा गिरविणें मला प्रशस्त वाटलें नाही. अेवढ्याच अेका कारणासाठी, नावीन्याची हौस म्हणून नवीन (Form) मीं घेतला असें नाही, तर त्या प्रेमकाव्याचा गाभाच मला असा वाटला की, अनेक पात्रें निर्माण करून त्यांच्या क्रियाप्रतिक्रियांची वेणी गुंफत जाअून तिऱ्हाअीतपणें कथा सांगत जाण्यापेक्षा तीमधील अेकमेव प्रमुख व्यक्तीच्या प्रणयजीवनांतील निरनिराळ्या अवस्थांतलें मनोगत वदवून तद्द्वारा कथानकाची अखेरपर्यंत मजल गांठण्यांत भावसौंदर्य अधिक घवघवीतपणें प्रकट होअील. कथाकथांत फरक असतो. अेखादी नाट्यगुणाने युक्त असते तर अेखादी निवेदनात्मक कादंबरीला योग्य असते, तर अेखादी नुसती भावकथाच म्हणून शोभून दिसते. 'जयमंगला' ही प्राधान्याने भावकथा. प्रमुख व्यक्तीचें भिन्न भिन्न अवस्थांतलें मनोगत गाअूनच ती कथा मांडायची म्हणजे ओघानेच भावगीतांची अेक मालाच गुंफावयाचें आलें; आणि तें तशा दृष्टीने यशस्वी झालें आहे असा माझा मला विश्वास वाटतो. पण ह्या भूमिकेवरून त्या काव्याचें सहानुभूतीने कितीकांनी परिशीलन केलेलें असेल ह्याचीच मला शंका वाटते.

जो प्रकार 'जयमंगले'चा तोच 'काव्यकिरीटा'चा. काव्यकिरीटांत तशा अेखाद्या कथानकांतल्याप्रमाणे विविध स्वभावपरिपुष्ट घटना नाहीत की भावगीतांतील अेकसंध भावनोद्रेक नाही. राज्यरोहणमहोत्सवांत घडलेले निरनिराळे समारंभांचे कार्यक्रम हें काय तें साहित्य. राष्ट्रीय जीवनांतील विशिष्ट काळाचें आंदोलन आणि आधुनिक अभिरुचीची लहर हीं सांभाळून तसल्या साहित्यांतून सुसूत्र प्रदीर्घ **काव्य** निर्माण करणें ही अेक करामत आहे असें त्या

बैठकीकडे आत्मौपम्य दृष्टीने बघणाराला पटायला पाहिजे. मी 'काव्य' शब्द मुद्दाम वापरतों. ह्याला खंडकाव्य म्हणायचें कीं महाकाव्य गणायचें हा प्रश्न नाही. नवनवीन होणाऱ्या प्रयोगांना जुन्या संज्ञांच्या तक्त्यांत बसवितां येईलच असें नाही. आणि त्या प्रस्थापित संज्ञांचे निकष लावून नवीन कृतींचें मूल्यमापन व्हायचें नाही. लेणीं कशीं अस्तित्वांत आलीं आणि इमारती कशा बांधल्या जातात हें पाहूं जाणाराला मूलभूत तत्त्वांची भिन्नता लक्षांत येईल. तीन मजली लेण्यांत वरचा मजला तिपई, मधला मजला दुपई आणि तळमजला एकपई अशा रीतीने खोदकाम करतां येतें. इमारतींत, अशी वरून खाली, दालनाची उतरती मांजणी करतां येणार नाही. तळमजला तिपई आणि सर्वांत वरचा मजला एकपई अशी बांधणी होईल. गवंड्याने इमारतीबाबतींतलें वजन पेलण्याचें आपलें ज्ञान त्या लेण्यांच्या बाबतींत लागू करून काय उपयोग? 'काव्यकिरीट' हें तदंगभूत नियमांनीच कसें सिद्ध आहे तें पाहायला हवें. म्हणजे कळून येईल की मुळांत काव्यात्म आगापिछा नसलेल्या वस्तूला कसे उदात्त आद्यन्त कल्पून रम्य व भव्य स्वरूप दिलें आहे. कांही बोललों तरी ती आत्मप्रशंसा म्हणाल. पण तुम्हीच निर्लेप मनाने आणि सावधानतेने तें काव्य वाचा म्हणजे तुम्हांला कळून येईल की—

सौख्योपभोगाकारणें नोहेच हें सिंहासन
व्हावें प्रजेच्या आपदांचें गादीवरोनी वारण

*     *     *

तो होय 'राजा' सार्थ जो सजतो प्रजेच्या रंजना

ह्या एका सूत्राचा प्रकरणाप्रकरणांतून विलास करून विखुर घटनांचा एकजीव घुमट उभा केला आहे. काव्यकिरीटाची घडण एखाद्या भरघोस भव्य गुच्छासारखी तर जयमंगलेची पनामा कालव्यासारखी भासेल.

आता तुम्ही म्हणाल तुमच्या स्फुट कवितांच्या वांट्याला तर अशी गैरसमजाची गत आली नाही ना?

माझ्या स्फुट कविता पुष्कळच आहेत. कवितालेखनाकडेच मुळी मी कसा वळलों आणि उगमाचा ओघ पुढे बदलत जाऊन त्याला सध्याचें स्वरूप कसें प्राप्त झालें हें "My First Attempt" ह्या नभोव्याख्यानांत पूर्वी सांगितलेंच आहे. 'आई' कवितेसंबंधी बोलतांना कविता कशी जन्म पावते वगैरे मुद्यांबद्दल चर्चा आली आहे. "कांहीं कवितांचे उगम" हा एक कविमनाचे चमत्कृतिमय विस्मयकारक व्यापार दर्शविणारा लेख तुम्हीं वाचला आहे ना? 'लिलाव' कविता विद्यार्थ्यांना समजाऊन देतांना अध्यापकाची देखील चुकभूल होत आहे असें कानीं आल्यावर, वर्षादीडवर्षापूर्वीची गोष्ट, मीं एक लेख लिहूनच तीमधील स्वारस्य विशद केलें.

वाच्यार्थावरच भर देऊन रसिक अकारण कीस कसा काढतात तोहि बघण्यासारखा असतो. 'यशोनिधी'मधील "हा अफाट सागर पुढें" ह्या कवितेंत मीं कूपमंडूकवृत्तीचा अधिक्षेप करून पराक्रमाच्या अफाट क्षेत्राकडे अंगुलीनिर्देश केला आहे. स्वाभाविकच, विहीर विरुद्ध सागर, असें रूपक घेतलें. उन्हाळ्यांत आटून चाललेल्या विहिरींत पोहरा सोडून खडे भरण्यापेक्षा, सूर मारून कपाळमोक्ष करून घेण्यापेक्षा, अगाध सागराच्या तळांतील रत्नांच्या लुटीचें ध्येय धरणें; विहीरीवरच्या डोणींत कागदी नावा नाचविण्यापेक्षा सागरावर दर्यावर्दी-

पणा करणें श्रेयस्कर, असा विक्रमशालित्वावर स्पष्ट रोख त्या कवितेंत आहे. खाऱ्या-गोड्या पाण्याचा, तृषाशमनाचा तिथे मुळीच प्रश्न नाही. असें असूनहि रसिकांनी विहिरीच्या गोड्या पाण्याचा कैवार घेऊन मला कवितेनेच उत्तरहि दिलें. अर्थात् तृषाशमन हा निराळा विषय होईल-निराळा दृष्टिकोन होईल; आणि त्यावर अधिष्ठित अशी कविता हृद्यहि होईल. पण ज्याचा उल्लेख मला अभिप्रेतच नाही, तो 'नाही' म्हणून उणेपणा काढण्यात स्वारस्य काय आणि रसिकाला कर्तव्य काय?

खरी बहार आढळली "आत्मवंचक देव" (यशोनिधी) या कवितेबद्दल.

"देवा! तुझा मृत्युलोकावरी ह्या कशाला तरी जाहला संभव?"
"अेकाहि भक्ता न हा सह्य झाला प्रसादें तुझ्या दुःखदायी भव"

अशी त्या कवितेची सुरवात आहे. पुढे, त्या कवितेंत म्हटलें आहे की देवा, तूं आपल्या भक्तांना—

"भ्रान्तींत लोटून केलेंस या दुष्ट किंवा कुणां लावियेलें पिसें."

शेवटीं सगळ्याच भक्तांना विन्मुख दवडणाऱ्या देवाला अर्थातच विचारणें आलें की—

"संपादिलें त्वां तरी काय देवा? अवस्था तुझी दैन्यवाणी किती?
पूजावया येअि कोणी न, गाया कुणी येअिना तेंवि शेजारती!
लावावया दीप येतो पुजारी, परी दृष्टि त्याची पगारावरी
तो दीप दावी तुझी दीनता, म्लानता, शून्यता मात्र भेसूरापरी
सर्वोपचारें तुला पूजितांना गमावी जया धन्यता, सार्थक,
जातां कधीं या पथीं तो म्हणे-'देव झाला स्वतांचाहि हा वंचक?"

अेका नामवंत टीकाकाराने ही कविता वाचून मला मूर्खांत काढलें. त्याचें म्हणणें "देव, सर्वसाक्षी देव, आत्मवंचक कधी नसतोच! देवाचीच जर वंचना होत असेल तर तो सर्वसाक्षी कसला? वंचना व्हायची ती भक्ताची. आणि ती त्याच्या निष्ठेतील दोषामुळे किंवा सकाम भक्तीमुळे!" वगैरे वगैरे. अर्थात् त्याचा हा सिद्धान्त बरोबर आहे. पण ज्या अर्थी हिंदु संस्कृतींत वाढलेला कवि देवाला आत्मवंचक म्हणतो त्या अर्थी त्याचा हा 'देव' म्हणजे राम, शंकर, कृष्ण, पांडुरंग, दत्त, अशांसारखा नसून दुसरा कोणी तरी असला पाहिजे असा तर्क रसिकांनीं कां करूं नये?

ह्या माझ्या कवितेमधील देव म्हणजे देवी— मानवी देवी, यौवन-गुण-सौन्दर्यसंपन्न देवी. तिच्या कृपाप्रसादांत आपलें जीवितसाफल्य मानणाऱ्या भक्तांची तिने निरनिराळ्या कारणांनी आणि मिषांनी निराशा केली; आणि अखेर अेक काळ तिच्या आयुष्यांत असा आला की कोणीहि तिची आराधना करीना. 'गुरव' दिवाबत्ती, झाडलोट करणार तो पगारासाठी. अित्यादि. ह्या दृष्टीने त्या कवितेकडे पाहिल्यास मीं पांघरलेल्या रूपकाचा चपखलपणा आपोआप पटत जाअील.

अेकंदरींतच सांगायचें की कवितेची भूमिका चटकन आकलन झाली नाही म्हणून, अेकदम तिच्यापासून परावृत्त होऊं नका. तिच्यावर नापसंतीचा शिक्का ठोकूं नका. कांही कांही विषय रूपकाच्या आश्रयानेच अधिक व्यापक, अधिक सखोल व अधिक चिरंतन होतात. आणि तशा कविता अुनावीळपणाने— सहज वरवर वर्तमानपत्र चाळण्याच्या गतीने— कशा समजणार?

# कवीच्या अंतरंगांत*–२

(सौ. अिंदिरा संत, बी. अे.)

रसिक हो !

मराठी कवितेची प्रकृति क्षीण होत चालली आहे, ' मराठी काव्याला मंदी प्राप्त झाली आहे, यासारख्या दुष्ट शंका घेतलेल्या माझ्या कानांवर येत आहेत; तुमच्याहि येत असतील. पण त्यांवर माझा विश्वास नाही, तुमचाहि नसावा. नाही तर माझ्या काव्यासंबंधी मी तुमच्याशीं चार शब्द बोलणें आज शक्य झालें नसतें. आपल्या जीवनाचा वेग भयंकर वाढला आहे आणि जीवनमरणाच्या शर्यतींत गुंतलेल्या घोडेस्वाराप्रमाणे आपण आपल्याला भारभूत होणाऱ्या गोष्टींचा त्याग करीत पुढे चाललों आहोंत. पण या त्याग करावयाच्या गोष्टींत काव्याचा क्रम लागेल असें मला वाटत नाही; नव्हे, काव्याचा त्याग आपल्याला कधीच करतां येणार नाही. कारण काव्य ही अंतःकरणाची प्रकृति आहे. जोपर्यंत अंतःकरण नांवाची कांही चीज आपणाजवळ शिल्लक राहील तोपर्यंत काव्य व त्याचे रसिक राहणार हें खचित. जगांत आज या घटकेला महायुद्धाचा भयंकर कोलाहल माजून राहिला आहे अन् आपल्या मायदेशांतहि तितकेच किंवा त्याहूनहि तीव्रतर प्रश्न आपलें जीवन झाकळून टाकीत आहेत. तरी तुम्हीआम्ही काव्याचा रसास्वाद घ्यावला जमत आहोंत. कवितेच्या प्रभावाचें याहून गमक दुसरें कोणतें असूं शकेल? अेका समाजवादी टीकाकाराने माझ्या काव्याविषयी काढलेले अुद्गार मला या ठिकाणीं सांगावेसे वाटतात. परीक्षणाच्या ओघांत त्याने म्हटलें आहे, ' संतांचीं हीं काव्यें हातावेगळीं करतांना असें वाटलें की हें धूसर चांदणें, जाअीजुअीचे नि प्राजक्ताचे हे सडे, हा मंद सुगंध– हें सारें स्वप्न तर नव्हे ! धूसर चांदण्याने कोंदाटलेल्या नभांतून आज प्रलयाग्नि बरसतो आहे, प्राजक्ताच्या फुलांच्या सड्याबरोबर मातांच्या अश्रूंचा सडा पडतो आहे आणि मंद सुगंधाबरोबर निष्पाप अर्भकांचे प्राण हवेंत विरताहेत. या वेळीं या काव्याची गोडी ती काय? पण मग असाहि विचार आला की हें सभोंवार चाललेलें मृत्यूचें तांडव ही जगाची नित्य प्रकृति नव्हे. हें केव्हा तरी थांबेल आणि मग माणसें पुन्हा चांदण्यासाठी, फुलांसाठी, सुगंधासाठी आतुर होतील.'' मग कां? आजच– आताच तीं आतुर नाहीत? आहेत. खचित आहेत. जीवनसंघर्ष अधिकाधिक तीव्रतर होत चालला आहे म्हणूनच तर तीं जास्त आतुर होत चाललीं आहेत. चांदणें, फुलें, सुगंध, प्रेम, माणुसकी यांचीं स्वप्नें अुराशीं बाळगूनच तीं या संघर्षांत लढत आहेत. या गोष्टींसाठीच अन् या गोष्टींनीच त्यांना लढण्याची अीर्षा चढत आहे आणि या आशेवरच या संघर्षाचा निकाल लावण्याची तीं अुमेद बाळगीत आहेत.

आजच्या मराठी कवितेने या भीषण संघर्षाच्या हातघाअींत घुसलेल्यांना फुलांचा, चांदण्याचा, सुवासाचा प्रत्यय आणून दिला, प्रेमाचें अन् माणुसकीचें वतन अजून सुरक्षित आहे याची ग्वाही दिली तर त्यांच्या वृत्ति अुल्हसित ठेवल्याचें श्रेय तिला खास मिळेल. येवढें करतां आलें तरी काय थोडें झालें?

हें मीं अेकंदर मराठी काव्यासंबंधी आणि पर्यायाने माझ्या कवितेसंबंधी म्हटलें. मला सारे-

*सौ. अिंदिरा संत, बी.अे., यांचें ता. १८ मार्च १९४३ रोजीं रेडिओवर झालेलें भाषण. (रेडिओ-चालकांच्या कृपेने.)

खरी जें म्हणायचें होतें तें साकल्याने मीं माझ्या कवितेच्या रूपानेच म्हणून टाकलें नाही का? रसिकांनी जाणावें असें जेवढें कवीला वाटतें तेवढें तो कवितेच्याच रूपाने रसिकांपुढे ठेवतो. तें तसें ठेवल्यानंतर त्यासंबंधी कांही सांगायचें राहिलें आहे असें त्याला वाटत राहिलें किंवा कवीने आणखी कांही सांगितलें पाहिजे असें त्याच्या कवितेसंबंधी रसिकांना वाटत राहिलें, तर त्याच्या काव्यांत कांही वैगुण्य राहिलें आहे हें खचित समजावें. हें जरी खरें असलें तरी कवितेचा आस्वाद पूर्ण घेऊन तृप्त झालेल्या मनांतहि कांही अेक कुतूहल तरळत राहतें हें मला मान्य आहे. हें कुतूहल कवितेसंबंधी आणि पर्यायाने कवीसंबंधी असतें हेंहि मी जाणूं शकतें. अुत्कृष्ट कलाकृति कशी निर्माण झाली हें जाणण्याची अुत्कंठा कुणाला लागून राहत नाही? आणि आज मला आपल्याला याच दृष्टीने कांही गोष्टी सांगायच्या आहेत.

'सहवास' हें पुस्तक किती चिमुकलें. त्यांतहि अर्ध्या भागाचें कर्तृत्व माझें. मोजूनच पाहायचें झालें तर अवघ्या ३७ कविता माझ्या! याला कारण असें की कविता करणें हा माझा अत्यंत आवडीचा छंद असला तरी कविता करण्याचा नादिष्टपणा मला नाही. माझ्या अेका कविमित्राने 'सहवास'वर टीका करतांना ही गोष्ट बरोबर ओळखली आहे. त्याने म्हटलें आहे, "काव्य करणें हा यांचा नाद किंवा व्यक्तिवैशिष्ट्य नसून ती त्यांच्या दिनचर्येची अेक सहज पडछाया आहे." छंदाच्या कलाकलानेच घेतल्याने मला कविता करण्याचें अुद्दिष्ट साध्य करतां येतें; नादिष्टपणा करून नाही. कविता करण्याचा नादिष्टपणा करून अेकसारख्या अुत्कृष्ट कवितांची निर्मिति करीत राहणें हें मी मोठ्या प्रतिभेचें लक्षण समजतें. रात्रीच्या परिभ्रमणानंतर घरीं आल्यावर बुटाचे बंद सोडतां सोडतां She walks in beauty like the night यासारखी महान् कविता लिहिण्याचें भाग्य फक्त बायरनचेंच म्हटलें पाहिजे. सुचविलेल्या विषयावर काव्य लिहिणें किंवा प्रासंगिक कविता रचणें हें मला मुळींच जमलेलें नाही. तें ज्यांना जमतें त्यांजबद्दल मला फार आदर वाटतो. सहवासांत अशी अेकहि कविता सांपडायची नाही की जी मी अमुक अेका प्रसंगानिमित्त लिहिलेली आहे.

पण मग तुम्ही विचाराल की आतापर्यंत तुम्हीं ज्या कविता लिहिल्यात त्या कशा लिहून झाल्या? त्यांचे विषय तुम्हांला कसे सुचले? प्रश्न अगदी सरळ वाटतो, पण त्याचें अुत्तर देणें तितकेंच अवघड आहे. खरें सांगायचें झालें तर असा प्रश्न मीं स्वतःला सुद्धा फार वेळा केला नसेल. मग त्यावर विचार करण्याची गोष्ट कशाला? पण आता कवितेकरिता मीं अमुकच विषय कां निवडले असा जेव्हा विचार करूं लागतें तेव्हा मला आढळून येतें की, निरनिराळ्या अनुभवांच्या ओघांतच ते माझ्या मनांत भरले. तो तो अनुभव मला जिव्हाळ्याचा वाटत होता म्हणूनच ते ते विषय मला जिव्हाळ्याचे वाटूं लागले. केवळ गमतीचे विषय म्हणून त्यांचें महत्त्व मला वाटत नसून त्यांचा माझ्या अनुभवाशीं जो संदर्भ आहे त्याचेंच मला महत्त्व वाटतें. मराठी कवितेच्या अेकंदर विषयांची यादी काढली तर त्यांची संख्या कांहीअेक ठराविकच भरेल, आणि या ठराविक विषयांत जें नावीन्य अुत्पन्न होतें तें केवळ रचनेने अुत्पन्न होतें असेंहि कुणीं म्हटलें आहे. पण तें मला पटत नाही. कारण केवळ रचनेने विषयांत नावीन्य अुत्पन्न होअील हें शक्य नाही. विषयांत नावीन्य येतें तें कवीच्या अनुभूतीने. म्हणून मला म्हणावेंसें वाटतें की विषय निवडण्याचें स्वातंत्र्य जरी कवीला दाखवतां आलें तरी त्या विषयावर काय लिहायचें या बाबतींत त्याला क्वचितच स्वातंत्र्य दाखवतां येतें. त्या विषयावर त्याला जें लिहावेंसें वाटतें तें त्याच्या अनुभूतीने सिद्ध करून ठेवलेलें असतें. या अनुभूतीच्या जादूमुळेच निरनिराळ्या कवींच्या त्याच त्या विषया-

वरील कविता भिन्न आणि पृथगात्म अुतरलेल्या आढळतात. माझ्या अेका कवितेचें अुदाहरण घेअूं या. आपण यशवंत, माधव ज्यूलियन, या कविश्रेष्ठांची 'आई' या विषयावरील कविता वाचली असेलच. माझीहि त्याच विषयावरील कविता पाहावी.

कळ्या माझ्या आनंदाच्या
सांठविल्या माझ्याकडे
फुलवाया तुझ्यापुढे
आसवें मीं सांटवीलीं
पापणीच्या कांठोकाठ
तुझ्यापाशीं देण्या वाट
ठरवीलें मनापाशीं
बोलायाचें कितीतरी
निजूनीया मांडीवरी
किती लांब वाटे काळ
कधी बाई भेटशील
जीव झाला अुतावीळ.

मी त्या वर्षी अेफ्. वाय्. करता म्हणून पुण्यास होतें. वसतिगृहांत राहिल्यावर कॉलेजच्या रम्य खेळकर जीवनाचा अनुभव माझ्या मनाला सुखवीत होता. तरी माझ्या वहिनीपासून —आईला मी वहिनी म्हणतें— दूर राहण्याचा तो माझा पहिलाच प्रसंग होता. तिच्या प्रेमळ सहवासाची अुणीव मला या ना त्या कारणाने सारखी वाटत राहायची. कधी कधी तर असेहि प्रसंग यायचे की तिची आठवण अनिवार्य होअून गहिवरून यायचें. पण मला रडें कधीच यायचें नाही; अुलट अशी आठवण आली, की आपण घरीं कधी जाअूं आणि कॉलेजजीवनांतील गमती आपल्या वहिनीला कधी सांगूं, तिच्या मांडीवर निजून दूरपणामुळे मनाला वाटलेली खंत तिला कशी समजावून सांगूं, याचींच स्वप्नें मी मनापुढे रंगवीं. अशाच अेका अनुभवाचें चित्रण मीं या कवितेंत केलें आहे. श्री. यशवंत यांची शोकपूर्ण आर्तता किंवा माधव जूलियन् यांच्या मनाची तळमळ माझ्या या कवितेंत दिसत नसली तरी माझ्या सुखदुःखांचें साधेंभोळें प्रतिबिंब त्यांत जें अुमटलें आहे तें मला अगदी परिपूर्ण वाटतें.

मी अगदीं शाळेंत असल्यापासून कविता करायला लागलें खरी, पण कवितानिर्मितीचा म्हणून जो कांही आनंद मला लाभला तो १९३२ नंतरच. तोपर्यंत कविता रचणें हा माझा अेक खेळ होता. या खेळाचें महत्त्व आता मला पटूं लागलें आहे. टी. एस्. अिलीयट यांनी अेझ्रा पौंड याच्या कवितासंग्रहाला प्रस्तावना लिहितांना जो मार्मिक मुद्दा अुपस्थित केला आहे तो या टिकाणीं मला आठवतो. त्यांचें म्हणणें असें की "A poet's work may proceed along two lines on an imaginary graph: one of the lines being his conscious and continuous effort in technical skill; the other his normal human course of development, his accumulation and digestion of experience. Now and then the two lines may converge at a high peak, so that we get a masterpiece". लहानपणापासून कविता लिहितां लिहितां मला जीं कांही वृत्तें आणि जाति स्वभावतःच आवडल्या त्यांवर मीं थोडीफार हुकमत मिळवून टेवली. आणि भाषेशीं खेळ करतां करतां भाषेच्याहि खुब्या

थोड्याफार जाणून ठेवल्या. मनाचीहि घडण होत होतीच. अनुभवांतहि भर पडत होतीच. पण १९३२ नंतर माझ्या आयुष्यांत ज्या कांही घटना घडल्या त्यांमुळे भाषा, वृत्त आणि अनुभव यांचा अेक विशिष्ट परिपाक निर्माण झाला. तो 'सहवासां'तील कवितांच्या रूपाने मीं आपल्यापुढे ठेविला आहे.

टेकडीच्या पायथ्याशीं बसलेल्या फर्गसन कॉलेजचें वातावरण किती रम्य ! आणि त्यांतच रानडे, पु. य. आणि आ. रा. देशपांडे दंपतींच्या काव्यात्म परंपरेची पडलेली भर ! अशा वातावरणांत कुणालाहि काव्य करण्याची स्फूर्ति व्हायची. माझ्याहि काव्यात्म वृत्ति पल्लवित होअून मोहरूं लागल्या. विशिष्ट घटनांमुळे त्यांचें काव्यस्वरूप निश्चित झालें. पण या रंगदार पार्श्वभूमीचे जे ठसे माझ्या कवितेवर अुमटले आहेत तेच मला आता अधिक मनोहर वाटतात. ते मला प्रिय आहेतच आणि अविस्मरणीयहि आहेत. संध्याकाळच्या वेळीं निवणाऱ्या टेकड्या वसतिगृहाच्या खिडकींतून मला दिसूं लागल्या की बाहेर पडून केव्हा अेकदा मी त्यांच्या मोकळ्या अंगावर बागडेन असें मला होअी. 'अुन कोळें ओलसर' मला जें अुन्मादवी तें तेथलेंच, आणि पदराशीं मस्ती करणाऱ्या ज्या वाऱ्याचा अवखळपणा मला हवाहवासा वाटे तोहि तेथलाच. 'काळे काळे अुंच कडे, हिरवें तें रान पुढे,' पायाखालीं घालतां घालतां ज्या 'अुन-सावलीची शोभा' माझें मान हरपून टाकी तीहि तेथलीच. 'माळ' या कवितेंतल्या

किती अुल्हासाने फुलें गोळा केलीं
माळ ही गुंफली मनोरम.

या ओळी मला पूर्वीच्या अुत्कटतेचा प्रत्यय देत नसल्या तरी माझ्या खोलींतून दिसणाऱ्या प्रि. महाजनी यांच्या आवारांत संथपणें अुभ्या असलेल्या बकुळीची आठवण करून देतात. मोसमांत तेथलींच बकुळीचीं नाजूक वासदार फुलें वेचून मी त्यांचे गजरे करीं. ही कविता वाचतांना त्या फुलांचा वास अजून तींत घोटाळतो आहे असें मला वाटतें. 'रातराणी' हें माझें सुनीत वाचायला घेतलें तर डायनिंग रूमच्या बाजूला फुलून अुतलेली रातराणी चांदण्याच्या मंदधूसर प्रकाशांत अजून डोलतांना दिसते. 'कोठें' या कवितेंतल्या

केव्हापासून पाखरूं
घालीतसे गोड शीळा
कोठे बोलाविते मला.

या ओळींवरून नजर फिरविली तर खिडकीसमोर आंब्यावर बसून ठराविक वेळीं घुमत राहणाऱ्या माझ्या ओळखीच्या शुभ्र पारव्याचें चित्र नजरेला दिसूं लागतें, आणि पुढे अधीर मनाचें

अधीरुनी गेलें मन
पंख राहे फुगवूनी
कुठे जाणार अुडूनी

असें जें वर्णन आलें आहे तें आता मनाचें वाटत नसून त्या पारव्याचा अुडून जाण्यापूर्वी पंख फुगविण्याचा जो मीं चाळा पाहिला होता त्याचेंच वाटतें ! अशा कितीतरी गोड अन् मधुर आठवणी या कवितांच्या संपुटांत सांठून राहिल्या आहेत. कविता वाचायचें निमित्त करून मी त्या पुन्हा पुन्हा ताज्या करतें आणि त्यांचा आस्वाद घेतें. पाहा यांतल्या कांही तुमच्या कल्पनांशीं जुळतात का. जुळत असल्या तर अुत्तमच. नाही तर मीहि कवि यशवंतांप्रमाणे म्हणेन की—

आम्ही ताजमहाल भव्य रचितों हा शब्दसंपत्तिनें
ज्याचें त्यास रहस्य राहुनि जनां कारागिरी लाभणें.

माझी पुष्कळशी कविता मीं ओवी छंदांत लिहिली आहे. हें माझें वैगुण्य टीकाकारांनी दाखवून दिलेंच आहे. पण मला तें वैगुण्य वाटत नाही. कारण माझ्या ठिकाणच्या कवितेला जर कुणीं जागें केलें असेल तर तें जानपद ओवीनेंच. जानपद ओवींतलें बावनकशी काव्य लहानपणापासून माझ्या मनाला मोह घालीत आलें आहे. त्यांचा रसास्वाद घेतां घेतांच माझी काव्यशक्ति वाढीस लागली आहे. अगदी लहानपणापासून मिळेल तेथून हीं जानपद गीतें गोळा करण्याची सवय मला जडली आहे. माझ्या खेडेगांवीं मीं गेलें की अेरवी लौकर न अुठणारी मी झुंजुमुंजु झालें की जागी होतें. पलीकडल्या खपरेलांतून जात्याच्या सुरावर रेखलेले ओवीचे सूर अैकूं येअूं लागले की मला अंथरुणांत पडून राहणें अशक्य होतें. मी स्वतांच्या घरीं हिंडतें आणि मिळेल त्या कपट्यावर मला नवीन वाटणाऱ्या ओव्यांचे चरण लिहून घेतें. माझ्या संग्रहीं असलेल्या अनेक ओव्यांत अितकें अुत्कृष्ट नि अुज्ज्वल काव्य खचून भरलें आहे की त्यानें कुणाहि रसिकाचें मन आकंठ तृप्त व्हावें. या ओवी-वाङ्मयाच्या सौंदर्यानें माझें मन अितकें भारलें अहे की त्याचा परिणाम माझ्या मनावर आणि काव्यरचनेवर न झाला तर नवल ! T. S. Eliot ने म्हटलेंच आहे की 'No one can be influenced by form or content without being influenced by the other.' माझ्या कवितेंत ओवी छंदाचें वैपुल्य आढळतें तें यामुळे ! माझ्या काव्यावर झालेला ओवीवाङ्मयाचा परिणाम श्री. के. नारायण काळे यांनी फारच मार्मिकपणें दाखवून दिला आहे. 'आअी' या कवितेबद्दल लिहितांना ते म्हणतात, "आअी या विषयावर यशवंत आणि माधव जूलियन यांच्याहि अुत्कृष्ट कविता आहेत, पण अिंदिरा यांच्या आअी कवितेमधली भावनेची अुत्कटता, कोमलता आणि सहजता फक्त जानपद ओवींतच सांपडूं शकेल, अन्यत्र नाही."

मला जें सांगतां येअील असें वाटलें तें येथे संपलें. पण हे माझे उद्गार अैकतांच तुमच्या चेहऱ्यावर मिस्किलपणाचें हसूं अुमटल्याशिवाय राहणार नाही. तें अुमटलेलें माझ्या कल्पनेला दिसत आहे. त्या हास्याचा अर्थ मलाहि कळतो. कारण तुम्ही मनाशीं म्हणत असाल की हिनें मोकळेपणाचें अवसान आणून सारें कांहीं सांगितल्याचें भासवलें पण त्यामुळे आम्ही फसणार नाहीं ! ज्या गोष्टीबद्दल आम्हांला अुत्कंठा होती तीच नेमकी हिनें टाळली. होय, अगदी बरोबर ओळखलें तुम्हीं. मी माझ्या प्रेमकाव्याबद्दल मोकळेपणाने बोलावें हीच ती अपेक्षा, होय ना ? मलाहि कळते ती. पण प्रेमभावना किती खोल, किती गूढ, किती नाजूक आहे हें काय मीं तुम्हांला सांगायला पाहिजे ? तिच्या अनुभूतीने माझ्या काव्यात्म-वृत्तीला जो मोहर आला तो काव्यरूपाने आपल्यापुढे आहेच. याहून त्याजबद्दल जास्त काय आणि कसें सांगायचें ? मला वाटतें पटेल आपणाला हें.

# श्री. वामनरावजी जोशी — वाङ्मयमूर्ति*

(श्री. पु. मं. लाड)

हा समारंभ गेल्या महिन्याच्या ऐकवीस तारखेस व्हावयाचा. मध्यंतरीं अुपस्थित झालेल्या सर्व अिडापीडा आता टळून गेल्या असून सारीं अमंगळ दुरितें पळून गेलीं आहेत. त्याचें समाधान मानून आज आपण पूर्वी योजिल्याप्रमाणे ऐकसष्टाव्या वाढदिवसानिमित्त वामनराव जोशी यांचें अभिनंदन करण्यासाठी जमलों आहोंत ही खरोखर आनंदाची गोष्ट होय. वामनरावांविषयी वाटणाऱ्या आदरयुक्त प्रेमाने या सत्कारसमारंभांत भाग घेण्यासाठी मला या ठिकाणीं खेचून आणलें आहे. आता येथे आम्ही प्रेमाच्या स्तुतिस्तोत्रांनीच वामनरावांचें आवाहन व स्वागत करणार. साहजिकच मला जुन्या यज्ञाचें रूपक सुचतें. प्रत्येकाने या वामनस्तवासाठी आपला वाक्संभार आणावयाचा आहे. अशा प्रसंगीं वयोगुणांनी वामनप्रमाण अशा ऐका वालखिल्याला होतृत्वाचा मान द्यावयाचें आपण ठरविलेंत यांत आपला औचित्यविवेक दिसून येतो. आवाहनास सुरवात करून द्यावयाची हें होत्याचें काम. मग इतर मोठमोठे अुद्गाते सूक्तें म्हणतीलच. अितकेंच मी माझ्या या अध्यक्षपदाचें प्रयोजन समजतों. आणि म्हणूनच नेहेमीचा शिरस्ता सोडून स्वतःच पहिली ऋचा म्हणावयाची असें मीं ठरविलें आहे.

तसें पाहतां धुळ्याला व रत्नागिरीला योगायोगाने पडलेल्या गांठी व पुण्यांत अधूनमधून होणाऱ्या भेटी यापेक्षा वामनराव या व्यक्तीशीं माझा गाढ परिचय आहे असें मला सांगतां येणार नाही. परंतु या वाढत्या परिचयापोटीं आदर जन्माला येअून तो आता प्रेमाने वृद्धिंगत होत आहे. तो अितका की आम्हां हिंदी न्यायाधीशांची वामनरावांनी बदनामी केली आहे हें मी आता साफ विसरून गेलों आहें. राजकीय खटल्यांत हिंदी न्यायाधीशापेक्षा 'फेअरमािअन्ड' अिंग्रज न्यायाधीशाकडून अधिक चांगला न्याय मिळतो अशी त्यांची अुद्धवगीता सांगते. पण न्यायाधीशावर असली टीका करणारें विधान म्हणजे बोलूनचालून विस्तवाशीं खेळ आहे म्हणून त्याची मीं गय केली ! पण 'नलिनी' या कादंबरींत लिव्हरपूल रिलीफ् फंडाकरिता भरलेल्या मीनाबाजारांत ऐका हिंदी न्यायाधीशाची काळी व कुरूप बहीण भपकेदार पोषाक करून ओळखीच्या रावसाहेबांना आग्रह करकरून आअिस्क्रीम घेण्यास सांगत होती असें जेव्हा मीं वर्णन वाचलें तेव्हा मात्र वामनरावांविषयी बंधुभावाचें नातें साफ विसरून जावें असा निश्चय करावासा वाटला. पण मग असा निर्धार केला की, वामनरावांच्या मनांत हिंदी न्यायाधीशांविषयी कितीहि तेढ असो, आपण अक्रोधाने क्रोधाला जिंकून अुघड-अुघड सर्वस्वीं त्यांची तरफदारी करणारें भाषण करून "जग हें असें आहे" हे त्यांचे आवडते उद्गार खुद्द त्यांच्याच तोंडून प्रत्यक्ष ऐकावेत ! म्हणून मी आपणांस आधीच बजावून ठेवतों

* प्रि. वामन मल्हार जोशी यांच्या षष्ठ्यब्दपूर्तिसमारंभाच्या दिवशीं अध्यक्ष श्री. पु. मं. लाड यांनी केलेलें भाषण.

की बाहेरचा म्हणून तिऱ्हाइत समजला गेलेला हा न्यायी समीक्षक येथील त्यांच्या संबंधी-जनापेक्षाहि वामनरावांचा अगदी पूर्ण पक्षपाती आहे.

स्तुतीमुळे वामनराव ओशाळतील म्हणून आम्ही आमचें हृद्गत कां सांगूं नये ? स्तुति आणि च्युति या दोन्ही जखणींचीं घरें जवळच आहेत असें राजवाड्यांप्रमाणे तेहि मानतात हें आम्ही जाणतों. स्मृतिलहरींत जगाची स्तुति आणि निंदा हें प्रकरण दोनदा आलें आहे तें केवळ अठ्ठावनीच्या विस्मृतीमुळे आलें असेल असें मला वाटत नाही. या द्वंद्वाच्या पलीकडे जाण्याच्या मुमुक्षेमुळेच त्या विचाराची पुनरुक्ति झाली ! "जगाच्या स्तुतींतहि अर्थ नसतो आणि निंदेंतहि अर्थ नसतो. सगळा मायेचा खेळ आहे" हें पटूनसुद्धा निंदाकालिकेच्या रूपापेक्षा स्तुतिसुंदरीचें सोंग इतरांप्रमाणे त्यांनाहि आवडतें हेंहि ते प्रांजलपणाने कबूल करतात. तेव्हा आमचा वामनरस्तव त्यांस मनस्ताप अुत्पन्न करील या भीतीने आम्हीं अवास्तव संकोच दाखवूं नये. मोठेपणाबरोबर स्तुतीच्या यातना ह्या ठेवलेल्याच. आमची हीं मापणें वाटल्यास त्यांनी जनान्तिक मानावींत. व्यक्तीचा संसार अेकदा लोकांच्या डोळ्यांदेखत नांदूं लागला म्हणजे त्या व्यक्तीचे रूपकर्ते टीकाकारच ठरतात. व्यक्ति असते कशी यापेक्षा ती दिसते कशी हें ठरविण्याचा हक्क त्यांचाच !

'षष्ट्यब्दपूर्ति' हें काय सोंग आहे असें पुष्कळांना वाटतें. पण तें त्या विशिष्ट शब्द-रचनेविषयी असावें, अन्तर्गत भावनेविषयी नव्हे. त्या शब्दसमूहांत सोंग भासलें तरी असल्या समारंभाची भाषा सोंगाडी नसते. आम्हांला खरोखर मनापासून आनंद होतो की वामनराव आम्हांला साठ वर्षांपर्यंत लाभले व आणखीहि बरींच वर्षें लाभणार. आणि आनंद कां होअूं नये ? पुरुष शतायु असतो असें जरी श्रुति सांगत असली तरी मानवी आयुष्यांतील संवत्सरांची मर्यादा आमच्या पूर्वजांनी साठच कल्पिली आहे. शतायु तर राहोतच पण साठायुसुद्धा महा-राष्ट्राला फारसे लाभले नाहीत. गोखल्यांसारखे सर्वकुशल राजकारणी, चिपळूणकरांसारखे ओजस्वी लेखक, माधवराव पटवर्धनांसारखे विदग्ध कवि, गडकऱ्यांसारखे प्रभावी नाटककार ज्या महाराष्ट्राला अल्पकाळच मिळाले त्या महाराष्ट्राने जे सुपुत्र साठीची मर्यादा उल्लंघूं शकले त्यांच्यासाठी प्रेमाचा खास समारंभ कां करूं नये ? बालकांच्या बाबतींत माता षष्ठिपूजन याच-साठी नाही का करीत ?

अेकसष्टावा वाढदिवस अशा समारंभासाठी निवडण्यांत व्यावहारिक अनुभवाची अेक गोम सामावली आहे. साठ या संख्येंत कांही तरी गूढ रहस्य आहे खरें. सांख्यांनीसुद्धा हीच संख्या निश्चित केली. माझ्या मतें ती परिणत झालेल्या प्रज्ञेची द्योतक आहे. अैन पंचविशींत अनिच्छेने घडलेले अविचाराचे प्रकार पन्नाशींत द्विगुणित होण्याची भीति असते हें अगदी साधेंच गणित होय. म्हणून पन्नाशीची झुळूक लागून गेली असतांसुद्धा ज्या मनाची प्रतिष्ठा अचल राहिली त्याचेंच साठींत अभिनंदन करावेंसें वाटतें. अठ्ठावनींत आठवणींना सुरवात होते असें धोंडोपंत बव्र्योस वाटतें; आणि कुणी वात्रट असें म्हणेल की पुढे सत्तरानंतर त्याच त्याच आठवणी फिरून फिरून सांगणारी शुकबहात्तरीची पोपटपंची सुरू होते. पण साठींत अनुभवाचा सांठा असतो. आर्यवैद्यकांत साठ दिवसांत तयार होणारा षष्ठिशालि हा भाताचा प्रकार बल-दायक व पथ्यकारक समजला जातो त्याचप्रमाणे साठ संवत्सरांच्या पूर्ण परिपाकाने तयार झालेलें चारित्र्य समाजास बलतेजशाली करील या आशेनेच आम्ही हे समारंभ साजरे करतों.

हा अेक 'परस्परं भावयन्तः'चा प्रकार असावा असा कांही धूर्तांस संशय येतो तो वृथा

होय. मानवी सद्‌गुणांची व अभिजात वाङ्मयाची जाहिरात करावी तितकी थोडीच. साहित्य-कारांनी अुल्लेखिलेली वाङ्मयांतील पूर्वीची गौडी रीति जरी अनुकरणीय नव्हती, तरी स्वतःच्या साहित्यिकांविषयी गोड गोड बोलून अितरांस मोह पाडणारी आजची बंगाली लोकांची गौडी रीति आपण अवश्य अनुसरिली पाहिजे असें माझें मत आहे. बंकीमचंद्र-शरच्चंद्रांविषयी आपण पुष्कळ माहिती वाचतों; त्यांचीं भाषांतरेंदेखील करितों. त्याचप्रमाणे आमच्या घरच्या मालाचीहि जाहिरात आम्हीं कां करूं नये ? त्यांच्या तुलेला वामनराव विशेष कमी भरतील असें मला तरी वाटत नाही. चंद्राप्रमाणे प्रकाशाबरोबर प्रशान्त व प्रसन्न आनंद वामनरावांच्या वाङ्मयाने आम्हांस दिला हें कोण नाकबूल करील !

या वर्षी मोठा विलक्षण योगायोग आला आहे की वामनराव जोशी, मामा वरेरकर आणि सावरकर यांचे याच क्रमाने अेकसष्टावे वाढदिवस येतात. मराठी वाङ्मयाच्या कुंडलींत १८८३ सालीं काय ग्रह होते याचा विचार कदाचित् तात्यासाहेब करंदीकरांनी केला असेल. मला वाटतें बुद्धिस्थानीं अशुभ योगांनी थोडेसे दूषित पण जात्या बलवान् असे राजकारणी व समाजकारणी ग्रह असले पाहिजेत. महाराष्ट्राचा हा नेहमीचाच आग्रह आहे की नुसतें स्वप्नाळू वाङ्मय नको; समग्र जीवनाचा पडताळा पाहणारें वाङ्मय हवें. सध्याच्या परिस्थितींत वाङ्मयाला राजकारण व समाजकारण यांजपासून अलिप्त राहणें हें अशक्यप्रायच होय. आणि त्या दृष्टीने पाहिलें तर वामनराव, वरेरकर व सावरकर या तिघांची विचार, प्रचार आणि आचार अशीच श्रेणी लावतां येअील. यांतील श्रेष्ठ विशेष कोणता हें ठरविण्याचें हें स्थळ नव्हे. या तीनहि व्यक्तींचें लिखाण चालूच आहे: अर्थात् प्रचारक मामांचें सर्वांत अधिक विपुल; तथापि 'न धरीं बोरु करीं मी' या प्रतिज्ञेचा अितरांकरिता सार्वजनिक अुच्चार करूनहि सावरकरांना राजकारणाच्या गडबडींतदेखील नाटकें लिहावयाला वेळ मिळतोच. अितकेंच नव्हे तर त्यांचें अलीकडचें अप्रकाशित कवितावाङ्मयसुद्धा विपुल झालें आहे असें माझ्या अैकिवांत आहे. भोवतालच्या समाजाशीं या तिघांचेंहि वाङ्मय तद्रूप होतें. वामनरावांच्या लिखाणांत तर राजकारणाचे नुसते पडद्याआडून पडसाद नसतात; त्यांतील पात्रेंच सारीं राजकारणाच्या रंगभूमीवर वावरत असतात. केवळ पताकास्थानें म्हणून सूचनेची शोभा आणण्याकरिता किंवा आधुनिकांचा अेक अभिनव संकेत म्हणून त्यांनी राजकारणाचा अुपयोग केलेला नाही. अेवढें मात्र खरें की त्यांच्या लिखाणांत चिंतनावर जास्त भर: प्रचार असा अेकंदरींत कमी. आणि म्हणूनच त्यांचें आतापर्यंत अेकुलतें अेक असें नाटक प्रभावी होअू शकलें नाही. तो नुसता नांवाचाच विस्तवाशीं खेळ होता; त्यांत आगलावेपणा नव्हता. पाणीसुद्धा पेटतें कसें करावें ही नाटकी कला निराळीच असते !

चिंतन व विचार हेच वामनरावांचे मुख्य मनोधर्म असल्यामुळे त्यांच्या कादंबऱ्यांची पद्धत अितरांहून अेकंदरींत वेगळीच झाली आहे. याचें मुख्य कारण म्हणजे त्यांच्या जीवनांत टॉल्स्टॉयच्या अगदी अुलट आधी तत्त्वज्ञान आणि मागाहून कादंबऱ्यांचें ललित लिखाण असा क्रम लागला. त्यामुळे त्यांच्या आरंभींच्या कादंबऱ्या हृदयाशीं भिडल्या तरी डोकें समतोल ठेवतात. सॉक्रेटिसाच्या वाचनाचा परिणाम म्हणून म्हणा किंवा देहस्वभाव म्हणून म्हणा संवादांतील वादानेच तत्त्वबोध करण्याची पद्धति त्यांनी आरंभींच स्वीकारली, व कोल्हटकरांसारख्या रसिकालासुद्धा असें म्हणावेंसें वाटलें की त्यांची पहिली कादंबरी म्हणजे तात्त्विक चर्चांचा अेक संग्रहच होय. जवळ बसून म्हणजे अुपनिषदाच्या थाटाची चर्चा वामनरावांना जुळते; अितकेंच नव्हे तर अुपनिषदांतलें तत्त्वज्ञान कादंबऱ्यांत आणून सोडावें ही त्यांची आकांक्षा बहुतांशीं सफल झाली आहे; पुढेमागे हे वामनी संवाद म्हणूनच ओळखिले जाण्याचा जबर संभव आहे.

सॉक्रेटिसाची संवादपद्धति जरी वामनरावांना आवडत असली, क्रितो व फिदो यांसारख्या सॉक्रेटिसाच्या संवादांचेंच त्यांनी जरी भाषांतर केलें असलें, तरी हे वामनी संवाद गडकऱ्यांसारख्या कठोर अुपहासकानेसुद्धा कंटाळवाणे म्हणून टाळले नव्हते. वामनरावांचीं पात्रें म्हणजे क्रितो व फिदोचीं खचित भावंडें नव्हत ! क्रितो काय किंवा फिदो काय— तीं नुसतीं निर्जीव वाजंत्रें— बोलविता धनी सॉक्रेटिसच. क्रितोला मुळीं आकृतीच नाहीं; मग ती कमनीय कुठून असणार ? त्याच्याशीं फक्त विचारांचीच 'समानी व आकूतिः' अितकेंच म्हणतां येअील. फिदोवर कोण फिदा होअील ? पण वामनरावांच्या वादविवादपटु मानसकन्या ब्रह्मदेवाच्या मानसकन्यांप्रमाणे ऋषिमुनींनासुद्धा मोह पाडतील ! रागिणीविषयीं ज्याच्या मनांत अनुराग वागत नाहीं असा कोणता अभागी रसिक असेल ! अुत्तरेच्या अुत्तरांनाच कां आम्ही भाळतों ? सुशीला देवाच्या शोधार्थ निघाली असेल, पण तिच्याच शोधार्थ निघणारे वाचकांत अनेक बळवंतराव सांपडतील आणि सरला अगदी विरला आहे असें म्हणण्याचा विनायकराव भोळ्यांप्रमाणे आम्हांलाहि अधिकार आहे ! सारांश, आरंभींच्या नवपुष्पकरंडकांतील पुष्पांत वर्णप्रकर्ष असला तरी तीं कागदी आणि म्हणूनच निर्गन्धी वाटतात. पण पुढे पुढे या मालाकाराचीं पुष्पें दोन्ही अर्थांनी 'सगन्ध' झालीं; व सर्वांचा त्यांजवर प्रेमाचा विश्वास वाढूं लागला. आणि कौतुकाची गोष्ट ही की या स्त्रियांच्या मोहिनीमुळे आणि विनायकराव भोळ्यांसारख्या लोकोत्तर पुरुषाच्या तेजामुळे तत्त्वज्ञान आपल्याला नकळत पाजलें जात आहे हें वाचक साफ विसरून जातो. वैद्यकांतली दुसरी अेक अुपमा घेअून असें म्हणतां येअील की हें तत्त्वज्ञान म्हणजे जणूं काय मापपर्णादि पथ्यकारक वनस्पति खाल्लेल्या कपिलेचें क्षीरच.

आरंभीं आरंभीं ही कादंबरीची, अिन्द्रजालाची कला वामनरावांना चांगलीशी साधली नव्हती. याची जाणीव खुद्द त्यांनाहि असावी. रागिणीने लिहिलेल्या गोष्टींवर टीका करतांना त्यांनी शास्त्रीबोवांच्या तोंडीं घातलेलें खालील वाक्य म्हणजे आत्मपरीक्षणाची टीकाच असेल कदाचित्. "ही रागिणीचीच गोष्ट घ्या ना. यांत काय आहे ? कांहीं तत्त्वज्ञान आहे का धर्म आहे— का काव्य आहे—आहे काय ? रागिणीला वाअीट वाटेल— पण खरें हें असें आहे !" पुढेसुद्धा केतकरांच्या कादंबऱ्यांचें परीक्षण लिहितांना केवळ परोपकारबुद्धिच जागृत नव्हती असें तेच कबूल करतात. "वादविवाद व विवेचन कलादृष्ट्या दोष आहे हें प्रथमच मान्य करून तद्विषयक थोडेंसें समर्थन करणें अिष्ट वाटतें. (माझ्या कादंबऱ्यांवर थोडासा असाच आक्षेप घेण्यांत येतो हें या 'अिष्ट वाटण्याच्या' बुडाशीं असण्याचा संभव आहे.)" ही जरी कबुली वामनरावांनी त्यांच्या नित्याच्या स्वभावास अनुसरून अुघड्या मनाने दिलेली असली तरी केतकरांच्या कादंबऱ्यांचा तुलनेस्तव नुसता अुल्लेख केला म्हणजे वामनरावांची कला किती श्रेष्ठ आहे याचें आणखी निराळें वर्णन करावयास नको. आरंभीं आरंभीं कथेच्या ओघाचें अनुसंधान आवरतांना वामनरावांस कदाचित् सायास घडले असावेत. रागिणीच्या अुत्तरार्धांतील मीरवली भागांत ओढून ताणून आणलेलें बल दिसतें. नलिनीच्या शेवटच्या प्रकरणांत रेस संपतांना होणारी, धापा टाकविणारी रस्सीखेच जाणवते. कधी कधी पात्राचें काय करावें हें आधीपासून निश्चित न केल्यामुळे नलिनींतील विनायकरावांसारख्यांचा पटकीप्लेगादिकांच्या महामारीने अन्त घडवून आणावा लागतो. अेकदा तर तत्त्वप्रतिपादनाच्या भरांत साध्या व्यवहाराचा देखील त्यांना विसर पडला. 'लोभमूलानि पापानि' हें तत्त्व सुनंदाकरवीं वाचकांवर बिंबविण्याकरिता सुनंदाचे त्यांनी अावशांत हाल मांडले; पण सुशीला-बळवंतरावांसारख्या सुखवस्तु सहचरांना त्याला त्या आपत्तींत सहज आसरा देतां आला असता हा मित्रकार्याचा साधा मार्ग त्यांच्या डोळ्यांआड झाला.

तें कसेंहि असो, शेवटीं अिन्दु काळे आणि सरला भोळे या कादंबरींत अैसपैस तत्त्वज्ञान अघळपघळ न मांडतां नीटनेटकी, बांधेसूद, अेकसूत्री रचना निर्माण झाली आणि म्हणूनच सुबक घडविलेल्या दागिन्याप्रमाणे, वाङ्मयांतलीच अुपमा घ्यावयाची तर, रघुनाथपंडिताच्या दमयंती-स्वयंवराप्रमाणे ती घडणावळ मोहून टाकते. आपल्या पहिल्या कादंबरीस त्यांनी 'काव्यशास्त्रविनोद' हें 'अुर्फ' नांव लावलें. शास्त्राच्या दोन्ही बाजूंस काव्य आणि विनोद ऋद्धिसिद्धीप्रमाणे असलीं तरी मध्यमणि शास्त्राचाच होता. नीतिशास्त्राच्या, तत्त्वज्ञानाच्या मुखाने त्यांनी मानवी जीवनाच्या सागरांत प्रवेश केला. नदीलाच योग्य अशा शिडांना विस्तीर्ण सफरीचें धाडस प्रथम जरासें जडच वाटलें असावें. पुढे दर्यावर्दीपणा अंगवळणीं पडलेला दिसतो, व तत्त्वज्ञानाचा ओघ जीवनालाच मिळतो व पावन होतो हें त्यांना आता कळून चुकल्याचा निर्वाळा देतात.

जीवनाच्या पोटीं तत्त्वज्ञानाचा अवतार घालावयाचा म्हणजे त्याच्यासाठी सगळा संसार आधीच कल्पून रचून ठेवावा लागतो. त्या कामीं वामनरावांना मार्मिक निरीक्षणाचें फारच साहाय्य झालें आहे. बारीकसारीक गोष्टींमुळे केवळ आमासच काय पण भोंवतालच्या जीवनाचा समग्र बोलपटच त्यांना दाखवितां आला. "छोटूचे बोबडे बोल अैकून अितका आनंद होतो की तो आम्हांला दोघांनाच ठाअूक. प्राकृत भाषा ज्याला शिकावयाची असेल त्याने छोटूने शब्दांचीं केलेलीं अपभ्रष्ट रूपें पहावींत म्हणजे त्याला 'महाराष्ट्री' वगैरे प्राकृत भाषांचे नियम आपोआप समजतील असें म्हणावयाचें असतें. प्राकृत भाषेचा तो माझा गुरु आहे असें म्हणून कधी कधी त्याला 'गुरुराज' ही पदवी तिकडून दिली जाते!" या अेकाच वर्णनांत सारी बालक्रीडा आली. प्रेमलालस मुलीकडून मनोगुहेंत सुप्त असलेल्या कामाचे निश्वास न टाकवितां 'दोघांचौघांनी आपणाला लग्न करण्याबद्दल विनंती करावी व अेकदोघांनी व्यभिचाराचाहि प्रयत्न करावा पण तो आपण होअूं देअूं नये अशी कमळेची अिच्छा होती' हें सांगण्यांत कुमारिकांचें मनोविश्लेषण आपोआपच झालें. मुलीच्या पसंतीस गेलेल्या धोंडोपंत बर्व्यांपाशीं शिवणकामाचा नमुना म्हणून खुद्द मुलीच्याच अंगावरचें पोलकें आअीकडून पाठविण्यांत वधूपरीक्षणाची खरी पारख झाली! 'पत्नीच्या अिच्छांना कशास कांही ठिकाण नसतांना सध्या विरोध करणें म्हणजे अुगीचच्या अुगीच गांधीलमाशांना डिंवचून स्वतःला नसता त्रास करून घेतल्यासारखें आहे हें ते ओळखून होते.' या वर्णनांत पत्नीशीं कलह हें जें संसाराचें खरें काव्य त्याचें सर्वस्व सांठवलें आहे!

व्यक्तीप्रमाणे समाजाच्या संसारांतलेसुद्धा त्यांनी असेच मार्मिक दाखले घेतले आहेत. सुशीलेचा देव या कादंबरींत कोकणांतील सोनगांवच्या वर्तमानपत्रांतील जे अुतारे दिले आहेत ते आजसुद्धा कोकणांतील कोणत्याहि वर्तमानपत्रांत सहज शोभून जातील. लिव्हरपूल रिलीफ् फंडाकरिता भरलेल्या मीनाबाजाराचें वर्णन कुणाहि संभावित संपादकास आजच्या दुसऱ्या असल्या मीनाबाजारांत स्वतः न जातांसुद्धा विशेष फरक न करून आपलें म्हणून छापतां येअील. डलहेड साहेबाचें डिपार्टमेंट विशेषसें पुढे गेलें कीं नाही हें मला सांगतां येणार नाही आणि सर्वोत्तम मजा म्हणजे सर्वोत्तम फणसेची! तत्त्वनिष्ठेपुढे व्यक्तींच्या भावना पार मारून (अर्थात् परक्यांच्या, स्वतःच्या नव्हत!) प्रगतिपथाकडे नेणाऱ्या भाअीपंथाची याहून सरस संभावना कुठेच मिळावयाची नाही! आगगाडींत वरच्या बर्थवरून दुग्धाभिषेक झाला असतां त्या माअीला आपलें डोकें थंड ठेवणें किती कठिण झालें!— अशा अेक ना अनेक मार्मिक

वर्णनांनी सजविलेल्या ह्या कादंबऱ्या (वामनरावांचें ऋण मान्य करून) आधी यथार्थलापिका झाल्या आणि म्हणूनच यथार्थदीपिका झाल्या!

सुरम्य योजना योजून या यथार्थलापणिका निर्माण करण्यांत त्यांनी कुशल हातचलाखी दाखविली आहे ती वेगळीच. आश्रमहरिणी आणि अिन्दु काळे ह्या त्यांच्या कादंबऱ्या अुत्कृष्ट कथा म्हणून मला फार आवडतात. त्या दोन्हींत गोष्ट सांगण्याचा प्रकारच मुळी चकवून टाकील अितका आकर्षक झाला आहे. नानाप्रकारच्या तळटीपा देअून जुनी पोथी सांपडल्याची बतावणी बेमालूम पार पाडण्याचा आश्रमहरिणींत त्यांनी आटोकाट प्रयत्न केला आहे. ही नावीन्याची टूम कदाचित् बेनसाहेबांच्या पुस्तकांवरून त्यांना सुचली असेल. पण आश्रमाचें वातावरण निर्माण करण्यासाटी जुन्या संस्कृत पुस्तकांतली भाषा योजण्याचें कौशल्य अर्थात् त्यांचेंच आहे. अिंग्रजींत पत्रात्मक कादंबऱ्या लिहिलेल्या नाहीत असें नाही परंतु 'सुशीलेच्या देवां'त डोकावणारी ही टूम अत्यंत परिणामकारक रीतीने 'अिन्दु काळें'त योजिलीं गेली.

या कोंदणाअितकीच त्यांची आंतील शब्दांची कारागिरीहि भुरळ पाडते. आरंभीं त्यांची भाषाशैली संस्कृताचा फारच अनुवाद करीत असे. लहान मुलाला जशी भरगच्च जरीची टोपी शिरोधार्य वाटते त्याप्रमाणे संस्कृत साहित्याच्या संस्कारांनी गजबजलेली वाणी त्यांनी प्रथम आदरिली. राजाज्ञेवरून केलेल्या दशकुमारचरिताच्या भाषांतराचे परिश्रम 'आश्रमहरिणीं'त बरेच अुपयोगी पडले असावेत अशी शंका येते. पण 'अिन्दु काळें'त आणि त्याहूनहि 'स्मृतिलहरीं'त यौवनाचा नटवेपणा पार जाअून प्रौढेचा साधा सहज सुंदर वेष त्यांच्या भाषेला शोभून दिसतो.

आपल्या तत्त्वज्ञानाचा प्रचार करतांना वामनरावांनी अशी खबरदारी घेतली की सारीं पात्रें स्वतःच्या जीवनांतील ओळखीच्या संसारांतील असावींत. त्यांचीं सुखदुःखें आपण स्वतः चिरपरिचयाने अनुभविलीं नाहीत अशीं पात्रें रंगविलीं असतीं तर तो वेगळाच रंग झाला असता; त्यांत जातिवंत कांतीचें लावण्य राहिलें नसतें. भाअीलोक त्यांच्या कलेची मध्यमवर्गाची म्हणून खुशाल हेटाळणी करोत, त्यांच्या नायिकांना हिंगासारखा हिंगण्याचाच अुग्र वास येतो असाहि ते यथेच्छ अुपहास करोत, मी हें त्यांच्या कलेचें दूषण नसून भूषणच समजतों. भाअींना सदा-शिव पेठेपेक्षा सदा-कलह पेठेंत राहणें आवडत असेल. त्यांना द्वंद्व आणि मध्यमपदलोपि हेच समास प्रिय असतील. पण ज्या मध्यमवर्गाच्या पांढरपेशा समाजांत वामनराव वाढले त्यांचेंच चित्र चितारण्यांत त्यांनी प्रतारणा ती काय केली? अफाट विश्वांतील आपला लहानसा कोनाडा प्रामाणिकपणाने सजविण्यांतच कलेचें खरें सत्य सांपडतें. 'वॉर् ॲन्ड पीस्'सारख्या विख्यात कादंबरींतील सर्व पात्रें टॉलस्टॉयच्या पूर्वीचीं ओळखीचींच होतीं, म्हणूनच आम्हांस त्यांची ओळख करून घ्यावीशी वाटते. स्त्रीशिक्षणाने शेफारलेल्या अशा भासणाऱ्या, पण अंतर्यामीं आर्यवृत्तीच्याच असणाऱ्या, मुली व मध्यमवर्गाच्या सामाजिक आणि राजकीय आकांक्षांत तन्मय झालेले पुरुष निर्माण करण्यांत, नसते मोह आवरून वामनरावांनी कलेचें सत्य संभाळिलें. 'माझें हें लेखन खरें असावें अशी माझी अिच्छा, हीच माझी कला, हेंच माझें सामर्थ्य आणि हीच माझी अीश्वराजवळ विनंती' हा निर्धार त्यांनी खरोखर पाळला. वास्तविक वामनराव विद्यार्थिनींच्या वातावरणांतच वावरतात हा नकृदर्शनीं होणारा नुसता आभासच आहे. 'विरतवाशीं खेळ' या नाटकांत बापकांच्या म्हणींचेच निखारे जास्त सांपडोत किंवा क्वचित्प्रसंगीं मुलींचीं लग्नें जुळविण्यांत त्यांनी करामत खर्ची घातलेली असो,

पण अितकें मात्र खरें की आपल्या कादंबऱ्यांना स्त्रियांचींच नांवें देअून त्यांनी स्त्रियांची शब्दशः केवळ नांवाचीच खुशामत केली आहे! आश्रमहरिणींत सुलोचनेपेक्षा धौम्यच, नलिनीपेक्षा वसंतराव, रंगराव व विनायकराव ही त्रयी, सुशीलेअितकाच सुनन्दा आणि सरलेपेक्षाहि विनायकराव भोळे हे अधिक जिवन्त वाटतात.

चित्रण खरें करण्याच्या कामीं वामनरावांनी आत्मचरित्राचा खचित अुपयोग केला आहे. आपल्या कादंबऱ्यांतून ठिकठिकाणीं स्वतःच्या जीवनाचे पडसाद त्यांनी परत अुमटविले आहेत. डिटेक्टिवांचा ससेमिरा, सेशन खटले, खटल्याचे सांधलेले कृत्रिम दुवे, पिस्तुलाचे मधून मधून होणारे आभास व क्वचितच अुडणारे बार, 'अियं सा जातिः परित्यक्ता' अशा अैटीने नव्हे तरी कष्टाने धौम्याकडूनसुद्धा करविलेला यज्ञोपवीताचा त्याग- हे सारे त्यांच्या खासगी जीवनाचे प्रतिध्वनि असावेत. ते तसे भासतात म्हणूनच त्यांच्या कादंबऱ्या नुसत्या शाअीने न लिहितां रक्तानेहि लिहिलेल्या आहेत असें निश्चित म्हणतां येअील. त्यांचा स्वभाव अितका सरळ की कलेसाठीसुद्धा सत्याशीं त्यांना प्रतारणा करवत नाही. हिंदी जेलरपेक्षा अिंग्रज जेलर बरा हा खासगत अनुभव त्यांनी कादंबरींत ग्रथित करून टाकलाच! आश्रमहरिणी ही पुनर्विवाहाच्या प्रचारासाठीं लिहिली ही घोषणा जातां जातां शेवटच्या वाक्यांत केलीच! दुसरा कुणी वस्ताद असता तर त्याने पुनर्विवाह हा शब्दच टाळून पूर्वी योजिलेला 'पुनरुद्वाह'च कायम ठेवून, शेवटचें वाक्य गाळून आपल्या भावार्थाचा निष्कर्ष वाचकावरच सोंपविला असता. त्यांच्या सर्व कादंबऱ्या लागोपाठ वाचल्या तर आत्मचरित्राच्या सारखेपणामुळे त्यांचा तोंडावळा कांही बाबतींत सारखा दिसेल कदाचित्, पण जनक कोण आहे हें कळण्याअितकाच तो सारखेपणा आहे. मला कधीं कधी असें वाटतें की वामनरावांनी आत्मचरित्र लिहिण्यापेक्षा स्वतःच्या कादंबऱ्यांवर अेक अलंकारवृत्ति- नव्हे 'अहंकारवृत्ति' लिहून त्यांतील आपली 'अस्मिता' स्पष्ट करावी. मग कादंबऱ्या वाचतांना त्यांच्या मनाच्या कोशांत जे अनेक 'गंड' दिसतात त्यांचा अुलगडा होण्याचा संभव आहे. त्यांच्या लिखाणांत अेकाच बाअीचें दोघांवर प्रेम कां जडतें? 'मी मरत नाहीं, माझी बायको मला जन्म देत आहे' असें रावबा किंवा 'सरला माझी सरला, अैशी पत्नी विरला' असें विनायकराव दोघेहि भ्रमांत कां बरळतात? अित्यादि अेक ना अनेक गोष्टींचा छडा लागेल! पण कदाचित् अशी अहंकारवृत्ति लिहिण्यांत त्यांना सुखापेक्षा दुःखच अधिक व्हावयाचें! कादंबऱ्या व्यापून दशांगुळें अुरलेली वामनी मूर्ति पाहावी असें वारंवार वाटतें खरें, पण तिची आम्हीं यथामति आपापल्यापुरती कल्पनाच केलेली बरी!

तसें पाहतां वामनरावांचें जें व्यक्तिमत्त्व ज्ञात आहे तेंच आम्हांला पुरेसें आहे. केवळ ललितलेखक म्हणून आम्ही त्यांचा गौरव करीत नाहीं. त्या लालित्याला प्रत्यक्ष जीवनांत आचरिलेल्या तत्त्वज्ञानाची जोड आहे. वामनरावांच्या मनोवृत्तीचा विकास कसकसा होत गेला हें माझ्यापेक्षा त्यांचे जवळचे आप्तेष्ट अनुभवाने जास्त चांगलें सांगू शकतील. माझीं अनुमानें केवळ त्यांच्या प्रकाशित वाङ्मयावरच आधारलेलीं आहेत. कॉलेजांत शिकतांना व बाहेर पडतांना कुणाहि संवेदनशील मनोवृत्तीच्या तरुणाचें मन बुद्धिवादी व ध्येयवादीच असतें. तशांत वामनराव कॉलेजांत होते त्या काळीं सरकारमान्य शाळेंतील शिक्षण म्हणजे गटारांतील गंगा असें म्हणण्यांत येत असे. तेव्हा समर्थ करणाऱ्या शिक्षणाकडे व भोवतालच्या विश्ववृत्ताकडे त्यांची वृत्ति वळलीं हें साहजिकच झालें. पुढे आपल्या दुर्दैवी आणि खडतर अनुभवाने अितरेजनांच्या भावना पार करपून गेल्या असत्या, परंतु सिंध देशांतून घरीं परत

येतांना त्यांची सरस्वती वार्टेतल्या रणाच्या मरुभूमींत लुप्त झाली नाही हा त्यांचा मोठा विशेष होय. सिंधचा परिणाम जर कांहीं झाला असेल तर तो केवळ नांवापुरता असा सिंधी लोकांप्रमाणे 'नी' छापाचीं नांवें कादंबऱ्यांना ठेवण्यांतच, झाल्याचा आभास होतो ! नलिनी ज्या काळीं रचली गेली त्या काळावर निराशेची थोडीशी छाया पडलेली दिसते. आपण जें केलें तें कदाचित् थोडेंबहुत चुकलें असेल. पुढे सुनंदा म्हणतो त्याप्रमाणे आपण अपेशी तर टरलों नाहीं ना ही शंका मधून मधून डोकावूं लागली. "आजचें सत्य तें उद्यांचें असत्य, आजचें मनोधैर्य तें उद्याचें अविचारित्व, आजचा स्वार्थत्याग तो उद्याचा अव्यावहारिकपणा असा माझा नित्याचा अनुभव आहे". असे उद्गार नलिनींत त्यांनी आरंभींच काढले. आणि उपसंहारांत तर त्यांनी अगदी स्वच्छ सांगून टाकलें की "वस्तुस्थिति व आपल्या मनाची आवड यांमध्ये जो मोठा खड्डा आहे तो या घटकेला तरी प्रस्तुत लेखकाला विसरतां येत नाहीं, त्याला नाइलाज आहे." तथापि त्यांचें मन लवकरच सांवरलें. निराशेने नैतिक तंतु खेचला गेला तरी तो तुटला नाही. कालाला जरी वारंवार नमन केलेलें असलें तरी त्याच्यापुढे कायमची मान वाकविली नाही. देशाभिमान कालमानाप्रमाणे कमी आग्रही झाला तरी थंडावला नाही. बुद्धीचा कोंडमारा होऊं न देतां सुविचाराने सर्व प्रमेयांची छाननी करून घेण्याची त्यांची वृत्ति मात्र दृढावली.

पुष्कळदा त्यांच्यावर असा आरोप करण्यांत येतो की ते अतिविचारांने निश्चयाप्रत पोचूंच शकत नाहीत. कांही लोक त्यांना तर्ककर्कशहि म्हणतात. पण त्यांच्याच शब्दांत वर्णन करावयाचें म्हणजे त्यांची वृत्ति मननशील व अंतर्मुख असली तरी ती सुलभविकार आहे. विनायकराव भोळ्यांप्रमाणे ते बाहेरून तत्त्वज्ञान्यासारखे वागतील आणि विनोदहि करतील, पण हृदय आंतल्याआंत जळत असेल. 'जग हें असें आहे' हा महामंत्र त्यांच्या कादंबऱ्यांत किती वेळ आला आहे याची सहज मजेने गणती करावी, पण तें आहे तसेंच राहावें, किंवा तें तसेंच चालावयाचें, असली अतिविचाराने निर्माण झालेली दुबळी वृत्ति त्यांची नाही. माझ्यामतें अतिविचार हा त्यांचा दुर्गुण नसून सुविचार हाच त्यांचा खास गुण आहे. खोट्या अजाण निश्चयाने पछाडण्यापेक्षा सुजाण संशयाने पछाडणें बरें ! हृदय आणि डोकें हीं ज्यांचीं दुरावलेलीं असतात त्यांच्याच बुद्धीचा चटकन् निश्चय होऊं शकतो. तेच हृदयाला गप्प बसवूं शकतात किंवा बुद्धीला गुंगवूं शकतात. डोक्याचेंच प्राधान्य असलेल्या आपल्या या पुणें शहरात हृदयाच्या जागीं डोकें व डोक्याच्या जागीं हृदय अशी मधूनमधून आलटपालट व्हावी असें मला पुष्कळदा वाटतें. केवळ तर्कानें कामें होत नाहींत; तो अप्रतिष्ठ आहे. प्रतिष्ठा येण्यास भावनेचीहि जोड लागते. आणि ती तशी मिळाली म्हणजे बुद्धि दोलायमान झालेलीच दिसणार. तर्क आणि भावना यांचा असा झगडा अर्जुनाच्या मनांत सुरू झाला म्हणूनच त्याला "तदेकं वद निश्चित्य" अशी केविलवाणी विनंती करून कृष्णाच्या तोंडाकडे आशेने बघावें लागलें. पण त्यालासुद्धा "किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः। ...कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ॥" यासारख्या तुमच्याआमच्या साध्या बुद्धीला आकलन न होणाऱ्या मंत्राचीच शेवटीं दीक्षा मिळाली ! खुद्द भगवंताचाच हा जर निश्चयमंत्र तर बिचाऱ्या वामनरावांची काय कथा ?

तरुणांना नेहमीं सतावणारा प्रेमाचाच प्रश्न घ्या ना !. या प्रश्नाचें माझ्या मतें वामनरावांनी निश्चित उत्तर दिलें आहे तें असें :—"प्रेमाबद्दल माझें असें मत झालें आहे की प्रेम हें पाखरासारखें आहे. पाखरू केव्हा कोणत्या झाडावर बसेल आणि केव्हा तें तेथून

अुडेल याचा नेम नाही. तसेंच प्रेमाचें आहे. लग्नाच्या बाबतींत मी प्रेमापेक्षा कर्तव्यनिष्ठेला आणि समजूतदारपणाला अधिक महत्त्व देतों. शिवाय सहवासानंतर सामान्यतः प्रेम अुत्पन्न होतेंच'' हेंच खरें निश्चित तत्त्व; अितर सारा शाळा-कॉलेजांतील मुलांमुलींचा वाद आहे! यांतच हृदय आणि डोकें, निष्ठा आणि विकार यांचा समन्वय सांपडतो! यापेक्षा अधिक निश्चित तें काय सांगावयाचें? वैवाहिक जीवनाची त्यांची कल्पना तितकीच निश्चित आहे. "अनुरूपता व अनुकूलता नसेल तेथे भिक्षुकांच्या कितीहि अक्षता पडल्या आणि होमाग्नीने डोळे कितीहि लाल झाले आणि सप्तपदीच नव्हे तर लक्षपदी जरी तेथे झाली, तरी तो विवाह नव्हे; ती अगम्यगमनाची कायदेशीर परवानगी आहे अेवढेंच!" "पत्नी ही अेक आपल्या मालकीची आणि केवळ अुपभोगार्थ निर्मिलेली अस्वतंत्र वस्तु आहे ही कल्पना आता मला अगदी पसंत नाही.'' यापेक्षा निश्चित मतें कुणाचीं असूं शकतील असें मला वाटत नाही, व कुणीहि साहित्यिक याहून सरळ अुत्तर देअील हें संभवतच नाही. सरलेसारखी पत्नी निर्माण करून हें तात्त्विक अुत्तर त्यानी सात्त्विक करून दाखविलें आहे.

प्रेमाप्रमाणेच अितर प्रश्नांचें. प्रत्येक गोष्टीची दुसरी बाजू त्यांना चटकन् दिसते. आणि दोन्ही बाजू अैकून घेतल्याशिवाय निकाल देअूं नये ही ज्या समाजाची न्यायाची पद्धत त्या समाजाने वाङ्मयांतच दुसऱ्या बाजूची अुपेक्षा कां करावी? या बाबतींत खुद्द वामनरावांनीच सुशीलेच्या नांवाखाली आपल्या ह्या सुविचारी वृत्तीचा विकास विशद करून वर्णिलेला आहे. तिच्या भाषणांतील व संभाषणांतील पूर्वीची धडाडीची, बालंबाल खात्रीची, अैकांतिक जहाल भाषा कमी होत जाअून त्याअैवजी त्यांत सौम्यता, निश्चयाचा थोडा डळमळीतपणा, अपवादांची शक्यता, विशिष्ट परिस्थिति असली तरच तें विधान सत्य आहे हें मान्य करण्याची प्रवृत्ति, हे गुण प्रथम डोकाअूं लागले, व मग दिवसेंदिवस अधिकाधिक बळावूं लागले; परंतु तत्त्वतः त्यांत फरक झाला नाही. किंबहुना वर निर्दिष्ट केलेले सौम्यतादि गुण आल्यामुळे तिचीं विधानें विचारी मनुष्याला अधिक सुलभतेने पटण्यासारखीं झालीं आणि अशा स्वरूपांत तर तीं बरोबर आहेतच, त्याविरुद्ध बोलणें दुराग्रहाचें व आकुंचित वृत्तीचें आहे, असें तिच्याशीं मनापासून बोलणाऱ्यांना वाटूं लागलें.'' या सुविचारास वाटल्यास संशय म्हणा; पण तो गोंधळून टाकण्यापेक्षा मार्गदर्शनच करतो. ॲरिस्टॉफेनिस या विनोदी नाटककाराने समकालीन सॉक्रेटिसाचें पात्र अेका टोपलींत बसवून रंगभूमीवर आणिलें व तरी तो हवेंतून चालणारा आहे असें वदविलें! माझ्या कल्पनेप्रमाणे मामा वरेरकरांना जर वामनरावांचें पात्र रंगभूमीवर आणावयाचें असेल तर ते झोपाळ्यावरच झोके घेत राहिले आहेत अशी दोलायमान वृत्तीची सूचना कदाचित् करतील? पण हें आपण विसरतों की ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत सारखा हेलकावे खात राहणारा घड्याळाचा लंबकच यथार्थ कालदर्शन करूं शकतो. तो जर का अेकाच बाजूस झुकला तर कालचक्र थांबलेंच म्हणून समजावें.

या सुविचारामुळेच सर्व गोष्टींकडे ते क्षमाशील वृत्तीने पाहूं शकतात. To understand all is to pardon all— "सगळें ज्याला समजलें तो सगळें क्षम्य समजतो'' हें तत्त्व त्यांच्या अंगीं अितकें बाणलें आहे की आपाततः अक्षम्य वाटणाऱ्या आचरणाचेंहि त्यांनी समर्थन केलें आहे. दुसऱ्याची पर्वा न करितां बोटींत जहाल अुतारूने पाय पसरला यावरून दुसऱ्याच्या देशांत पाय पसरणाऱ्या साम्राज्यवाद्याची ते लगेच कैफियत मांडूं शकतात. धर्मग्रंथांत खोटेच श्लोक घुसडून देअून प्रजेला अन्याय करणाऱ्या न्यायाधिशालासुद्धा

माफी द्यावयास ते तयार झाले ! वाकडें पाऊल पडलेल्या कमळेविषयी किंवा कलेच्या मोहाने कलीकडे आकर्षिल्या गेलेल्या अिन्दुविषयींसुद्धा त्यांनी सहानुभूति निर्माण करून त्यांना क्षमा केली. त्यांचें 'कांच आणि मणि' हें नलिनींतील प्रकरण वाचल्यानंतर "तुमच्यांत जो धुत-लेल्या तांदळासारखा शुद्ध असेल त्याने पहिला दगड मारावा" या खिस्ताच्या वचनाची आठवण होते. त्या प्रकरणाचा निष्कर्ष हाच वामनरावांच्या तत्त्वज्ञानाचा भावार्थ होय. वास्तविक कोणत्याहि अपराधाकडे– मग तो पुरुषाचा असो वा स्त्रीचा असो– समाजाने सौम्य, अुदार, क्षमाशील, न्यायनिष्ठुर नव्हे तर प्रेमसदय दृष्टीने पाहावें. चुकी कोणाच्या हातून होत नाही ? दुसऱ्या स्थळीं तोच प्रश्न वामनराव अन्य तऱ्हेने विचारतात: "अन्याय अन्याय म्हणून तुम्ही ओरडतां, देवापुढे जाअून सर्वांगीण न्याय मागण्याची छाती आहे का तुम्हांपैकी अेकाची ?"

याच क्षमाशील वृत्तीमुळे दुसऱ्यांना दुखविण्याचें वामनरावांच्या जीवावर येत असावें. त्यांचा अुपहाससुद्धा मन न दुखविणारा असतो. या ब्राह्मणाचें हृदय खरोखर "नवनीत" आहे. आश्रमहरिणीचा मनासारखा शेवट त्यांनी आरंभीं केला नाही याचें खरें कारण भीरुता नसून लोकमताला अुगाच धक्का कां द्या ही भावनाच असावी. पुढे पांचाली पंथ समाजाच्या पचनीं पडेल अशी खात्री झाल्यावर मनाजोगा फेरफार त्यांनी केला. कलावंताने लोकमताचा अितका मान कधीच राखला नसेल ! त्यांची सदैव हीच अिच्छा की Sweetness आणि Light यांचा जय व्हावा !

क्षमा अंगीं बाणावयाची असेल तर त्याला प्रज्ञा लागते. मनुष्य 'विदुर' व्हावा लागतो. आणि खरा ज्ञानी तो की ज्याला आपल्या अज्ञानाची पूर्ण जाणीव झालेली असते. तो प्रचलित ज्ञानाच्या समजुती गृहीत धरीत नाही. सर्व प्रमेयें तपासून घेण्यांतच त्याला ज्ञान मिळतें. प्रत्येक युगाच्या व माणसाच्या श्रद्धा निरनिराळ्या असतात व त्यालाच नवें ज्ञान म्हणतात हें तो ओळखतो. आणि म्हणूनच शेवटीं "पांडित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत्" यांतच त्याला आनंद वाटतो. "ततः किम्" ही अुदासवृत्ति वामनरावांच्या तत्त्वज्ञानांत येअू लागली हें अगदी अपेक्षितच होतें. ह्या प्रश्नाने अनेकांस निरुत्तर केलें आहे ! आणि म्हणूनच स्वतः निर्मिलेल्या काल्पनिक संसारापासून अलिप्त नामानिराळा राहण्याची वामनराव सारखी धडपड करीत असा-वेत. वामनराव जोशी ही तिऱ्हाईत व्यक्ति कादंबऱ्यांतसुद्धा घुसडून देण्याचें अेरवी काय प्रयोजन होतें ? काल्पनिक पात्रांशींसुद्धा समरस होण्याची त्यांस भीति वाटत असावी ! माणसांच्या निरनिराळया तक्रारींचें शान्त तात्त्विक अलिप्ततेने आणि कलात्मक आश्चर्यवत् वर्णन करणें, पूर्वी स्वतः नट होतों ही जाणीव बुजवून आता तिऱ्हाअिताची तटस्थ वृत्ति संपादणें, कूर्मासारखीं आपलीं अंगें आंत घेणें हाच-आता वामनरावांच्या कलेचा संन्यासाश्रम होय ! देव ध्येय असतो खरा; पण प्रज्ञा-क्षमा-शान्ति या त्रिपुटींत तो सदैव वसतो हें त्यांनी प्रचीतीने शोधून काढलें आहे !

ज्ञान आणि निर्वेद, क्षमा आणि शान्ति, Sweetness आणि Light यांचा अखंड प्रचार करणाऱ्या वामनरावांना मी त्यांनीच केलेल्या अेका वर्णनाचा थोडाफार फेरफार करून आहेर करणार आहें. "सुप्रसिद्ध, सूक्ष्म बुद्धीचा व अुच दर्जाचा तत्ववेत्ता असून 'जगताचें तत्त्व समजणें शक्य नाही' असें प्रतिपादणारा; सर्वांत शहाणा असून 'मला कांहीं समजत नाहीं' असें म्हणणारा; अतिशुद्ध वर्तन करणारा; स्वतः वर्तनांत अति साधा असून प्रसंग पडल्यास

अितरांपेक्षा अधिक सिगरेट्स व चहा पिणारा; शिकत आहे असें दाखवून शिकविणारा, व 'वेडा आहे' असें म्हणून शहाण्याचें वेड दाखविणारा; अधिकारारूढ, जबरदस्त पक्षाला न भिणारा; रंगेल पंथ व अुदास पंथ या दोन्ही पंथांना प्रसरविणारा असा हा विरोधाभासपूर्ण विलक्षण कोमल मनाचा ब्राह्मण आहे. त्याचा खरा संदेश त्याच्या पुस्तकांपेक्षाहि त्याच्या जीवनांत आहे ! अेक प्रख्यात चिनी अुपमा योजावयाची म्हणजे पुस्तकें हीं काळाच्या वाळवंटावर ग्रंथकाराची अुमटलेली पावलें होत. त्या पायांत प्रत्यक्ष काय चेतनाशक्ति होती हें पुढील पिढीस कळणें शक्य नाही. तें कळण्याचें भाग्य आम्हांसच साठ वर्षे लाभलें याबद्दल आमचें आम्हींच अभिनंदन करून घेतलें पाहिजे. सॉक्रेटिसाच्या आयुष्याशीं वामनरावांनी आदि-अुपान्त्य प्रास बरेच साधले असले तरी त्यांचें अन्त्य यमक अद्वितीयच राहाणार. वामनरावांविषयी माझी स्वतःची अेकच अपेक्षा आहे. ती त्यांनी आपल्या स्मृति किंवा आत्मचरित्र लिहावें ही नव्हे. विस्मृति जाणवूं लागली की लोक स्मृति नोंदतात; बहुधा चरित्र संपलें की आत्मचरित्र लिहावयास लागतात. माझी अपेक्षा हीच की वामनरावांनी आता यापुढे यथेच्छ मनसोक्त जगावें. तसें जगण्यास आवश्यक असलेली परिस्थिति कृतज्ञ महाराष्ट्र त्यांस खचित तयार करून देअील. शक्ति, बुद्धि शाबूत असलेलें त्यांचें जीवन शक्य तितकीं अधिक वर्षे आम्हांस लाभो व त्यांची संगति 'गंगेसारखी, साधुसंगतीसारखी, कविसंगतीसारखी' अधिकाधिक पावन वाटत राहो अशी मी तुम्हां सर्वांच्या वतीने देवापाशीं प्रार्थना करतों.

## निकाशविषयक पारिभाषिक संज्ञावलि

[टीप— खालील संज्ञावलि परिभाषामंडळाने चर्चेनंतर निश्चित केली असून ह्यावर कोणास कांही सूचना करावयाच्या असल्यास त्या अवश्य कराव्यात अशी विनंती आहे.

—चिटणीस, परिभाषा चर्चा मंडळ.]

Aberration अपभ्रेप
  Chromatic वर्णकीय
  Spherical गोलकीय
  Coma कुन्तलीय
Aberrations अपभ्रेष
  [भ्रेश slip लहानशी क्षुल्लक चूक; भ्रेष मोठी चूक, क्षम्य नाही अशी; प्रमाद फारच मोठी चूक, अक्षम्य.]
Albumen वलक्ष, वलक्ष
  [Yolk पीतक White of egg शुभ्रक]
  [White corpuscles रुधिरांतील श्वेतक; red ,, ,, रक्तक]
Arrest स्तम्भित अ० स्तब्ध करणें
Astigmatism (aberration) अनैक्य (अेक अपभ्रेप)
Brightness भास्वरता
  [दीप्ति luminous intensity
  प्रभा luminous flux
  प्रभास illumination
  भास्वरता brightness]

[अुद्भासन Illumination, अुद्भ्रम-
सित करणें, अुजळ करणें Illuminate
[विभासन whitewashing भिंतीला
चुना सफेदी देणें.
विभासित whitewashed]
Chlorophyll हारित्यक
Chromatic aberration वर्णकीय अप-
भ्रेष; वर्णकीय
Cinema house निकेतन
Colloid कलिल
Colloidal कलिलवृत्ति
Colour वर्ण
Colour-blind वर्णान्ध
Colour Spectrum वर्णावली
[अरुण, ताम्र, पीत, पालाश, नील,
आकाश, अिन्द्र]
Coma कुन्तलीय अपभ्रेष; कुन्तलीय
Contrast प्रभेद; प्रभिन्नता
Contrasty प्रभेदक, प्रभेदी
Copying प्रत्यापण
Cover स्थगित करणें, झाकणें; [स्तम्भित
म्हणजे थांबविलेले आणि स्थगित म्हणजे
झाकलेले.]
Crystal स्वक
[Amorphous अस्वक
Crystalline स्वकीन]
Crystalloid स्वकवृत्ति
[Colloid कलिल
Colloidal कलिलवृत्ति]
Curvature of field (aberration)
क्षेत्रनिम्नता (धन अ० ऋण)
[१ अरुण–ताम्र, २ पीत–पालाश,
३ नील-आकाश–अिन्द्र. अिन्द्र = अत्यन्त
प्रभावी]
[Dye रंग, Pigment पिञ्जक,
Varnish प्रावार, Paint प्ररोच, रोगण]
Dark room अन्धिका; अंधारकोठडी
Develop अुद्भेद करणें; अुद्भेदन
Developed अुद्भेदित
Development अुद्भेदन; अुद्भेद
Dispersion वर्णवैपम्य, वर्णव्यक्ति, वर्ण-
व्यञ्जन
Diaphragm गवाक्ष
Distortion (aberration) वैकृत
Double exposed द्विघोपकाशित
Dye रंग
Emulsion कश्मलक, कश्मला, कश्मल
Enlarging प्रवर्धन
Exposure अुपकाशन; अुघडीक
[अनुकाशन fluorescence
अुत्काशन phosphorescence]
Fix स्थिर करणें
Fixing स्थिरीकरण
Flicker लुकलुक
Focal length आयमन
Grain दाणा, दाणेदारपणा
Illustration अुदाहार
Image (photographic) प्रतिरूप
latent image गूढ प्रतिरूप
Infra-red अुपारुण
Landscape भूभाग; भूदृश्य, भुईदेखावा
Lens यावक, भिंग
Positive lens धन यावक
Converging lens अभियावक
Negative lens ऋणयावक
Diverging lens वियावक
Light-sensitivity प्रकाशविदुरता
Magnifying, magnification विवर्धन
Movie चलचित्र
Negative प्रतिकाश (अ० प्रतीकाश
छाया-प्रकाश यांची अुलटापालट ज्यांत
आहे)
Object and image (photographic)
रूप-प्रतिरूप
[प्रतिमा effigy मूर्ति idol
आकृति figure पुतळा statue

सादृश्य likeness पुत्तलिक bust
प्रतिकृति imitation मूर्तक model
आराखडा outline रेखाटी curve
प्रभक्ति pattern चित्र picture उदाहार illustration अि०]

Over-exposure अत्युपकाशन
Over-exposed अत्युपकाशित
Panorama प्रालोक
Persistence of vision दृष्टानुबन्ध
Perspective पर्यालोक
Photograph निकाश
[छायाचित्र Shadowgraph, radiograph, X-ray photograph पारायणिक छायाकृति; पारायणिक]
Photographic apparatus, instruments, materials etc. नैकाशिक अुपाकृत, साधनें, सामग्री अि०
Photographic Camera निकाशकोटर; निकोटर; कोटर
Photographer निकाशक
Photography १ निकाश-कला २ नैकाश्य
Pinhole Camera छिद्रकोटर
Portrait प्रालेख्य
Positive संकाश
(ज्यांतील छायाप्रकाश विपर्यस्त नाहीत म्ह० अुजू आहेत)
Sensitive to light प्रकाशविदुर, दीप्र
Sensitive (paper, plate, film) दिप्रा, दिप्री, दिप्रें (कागद, काच, कचकडें)
Sensitiveness to colour, colour sensitivity वर्णविदुरता
[वहादर्शाची सूक्ष्मता अथवा सुचलता sensitiveness of a galvanometer]
Shutter जवनिका; झडप
Snap अुन्मेष
Spherical aberration गोलकीय अपभ्रेप; गोलकीय
Stand ठिया
Studio कलास्थान
Talkie वदच्चित्र
Tone छटा
Tripod तिपाअी
Ultra-violet अतीन्द्र
actinic
Chemical
[अिन्द्र म्ह. अत्यन्त प्रभावी]
Under-exposed अल्पोपकाशित
Under-exposure अल्पोपकाशन
Undeveloped अनुन्द्भेदित
Unexposed अनुपकाशित
Unequal illumination (aberration) प्रभासवैषम्य
Variable area method भिन्न-क्षेत्र-पद्धति
Variable density method भिन्न-घनता-पद्धति

---

# ध्वनीला अर्थ कीं अर्थाला ध्वनि

(लेखक— श्री रामानंदयति)

श्री. कृ. पां. कुळकर्णी यांनी ध्वनीला अर्थ कसा प्राप्त झाला अेतद्विषयक लेख म. सा. पत्रिकेच्या ऑक्टोबर १९४२ च्या अंकांत लिहिला आहे. त्यावरून सुचलेले कांही विचार लिहीत आहें. प्राणी मातेच्या अुदरांतून बाहेर येतांच ध्वनि काढतात असें दिसतें. जारज, अंडज, स्वेदज व अुद्भिज हे चतुर्विध जीव गर्भाशयांतून कांहीतरी आवाज करीतच बाहेर येत असले पाहिजेत. अुद्भिजाखेरीज तीन सृष्टीचे जीव ध्वनि करीतच बाहेर पडतात असें आज स्पष्ट अनुभवाला येतें. हें सर्वमान्य आहे. अुद्भिजसृष्टि बाहेर येतांना आवाज करीत असावी असें अनुमान होतें. तद्विषयक शोध जगदीशचंद्र बोस यांच्या लिखाणांतून तज्ज्ञ देअूं शकतील. पोटांत अथवा मस्तिष्कांत कांही तरी संवेदना होते व ती कोणत्यातरी मार्गाने आवाजाने प्रगट करण्याची साहजिक प्रवृत्ति जीवाला झाल्याने त्याच्या तोंडांतून व नाकांतून कांही ध्वनि निघतो. हा पहिला ध्वनि केव्हा निघाला व त्याचें स्वरूप काय होतें याचा शोध वेदांतून बारकाअीने पाहिल्यासच लागण्यासारखा आहे.

(१) ॐकारश्चाथकारश्च द्वावेतौ ब्रह्मणः पुरा।
कण्ठं भित्त्वा विनिर्यातौ तस्मान् मांगलिकावुभौ॥

या सुप्रसिद्ध श्लोकावरून मुखनासिकावचन ॐ व अ हीं अक्षरें सृष्टीच्या आरंभीं प्राण्यांच्या तोंडून निघालेलीं दिसतात.

(२) छांदोग्यांतील अुद्गीथ विद्येचाहि या वेळीं ध्वनिशोधकांनी विचार करण्यासारखा आहे. मानसिक संवेदना म्हणजे मनांतील कांही तरी अर्थ प्रगट करण्यासाठी प्राण्याने ध्वनि केला. तेव्हा अर्थोद्बोधनासाठी ध्वनि असावा. ध्वनीला अर्थ मागून चिकटलेला नाही असें म्हणावयाचें आहे. अ व ॐ हीं दोन अक्षरें प्राणी श्वास घेअूं लागल्याबरोबरच आपलें अस्तित्व प्रगट करण्यासाठी ध्वनिरूपाने उच्चारता झाला. येथून भाषेला आरंभ झाला असावा.

'अकारो वै सर्वा वाक्।

अशी छांदोग्यश्रुति आहे. अव्यक्त शब्द, थोडा निरनुनासिक— व थोडा अनुनासिक— असा संमिश्र ध्वनि प्राणि अुपजतांच अुच्चारतो असें आपल्या दृष्टोत्पत्तीस येतें.

(३) ऋग्वेदामध्ये 'हिं कृण्वति०' अशी ऋचा आली आहे. त्यावरूनहि सामगानांत हिम् हा शब्द समावेशिलेला दिसतो. अधिक शोध या बाबतींत विद्वान करूं शकतील.

(४) तैत्तिरीय आरण्यकामध्ये प्रवर्ग्यविषयक मंत्रांत शब्दांचें निर्वचन आलें आहे. त्यामध्ये 'यद्घ्रा३ अित्यपतत्' हें भूमीवर ज्या वेळीं यज्ञपुरुषाचें शीर पडलें त्या वेळीं 'घ्राम्' असा जो ध्वनि निघाला त्याचें वर्णन आहे. प्रवर्ग्य, घर्म, महावीर, सम्राट् या शब्दांचें निर्वचन दर्शविणाऱ्या या श्रुति आहेत. (तैत्तिरीय आरण्यक प्रपाठक ५ अ० १)

ध्वनि व अर्थ यांचा परस्परसंबंध मुळांत काय असावा ? ध्वनि तरी कां अुत्पन्न झाला ! म्हणजे काय अर्थ मनांत सांठवून किंवा मेंदूंत धारण करून तो प्राण्यांच्या मुख-नासिकांतून बाहेर पडला याचें विद्वानांनी अत्यंत प्राचीन वेदादिकांतून सम्यक् परीक्षण लेखनद्वारा पत्रिकेंत करावें या हेतूनेच केवळ या चार ओळी लिहिल्या आहेत.

---

अनुक्रमणिका

# ध्वनीला अर्थ कसा प्राप्त होतो ?

## आक्षेपाचें निरसन

(लेखक— प्रा. कृ. पां. कुलकर्णी)

श्री रामानंदयतींचा लेख पाहिला. त्यांतील त्यांचा खरा मतभेदाचा मुद्दा त्यांच्या पुढील वाक्यांत आहे. "मानसिक संवेदना म्हणजे मनांतील कांहीतरी अेक अर्थ प्रगट करण्यासाठी प्राण्याने ध्वनि केला. तेव्हां अर्थोद्बोधनासाठी ध्वनि असावा. ध्वनीला अर्थ मागून चिकटलेला नाही असें म्हणावयाचें आहे." बाकीचा त्यांचा मजकूर ह्या विधानाचा परिष्कार आहे. सदर (१), (३) व (४) मध्ये वैदिक वाङ्मयांतील अुदाहरणें आहेत. तेव्हा वरील विधानाचा विचार झाला म्हणजे सर्व झाल्यासारखें आहे.

त्याला अुत्तर हें असें आहे: 'प्राण्याने ध्वनि अुत्पन्न करण्याच्या पूर्वी त्याच्या मनांत मानसिक संवेदना होती. कांहीतरी अर्थ प्रगट करण्यासाठी त्याने ध्वनि अुच्चारिला' असें ते म्हणतात. प्राण्याच्या मनांतील संवेदना किंवा कांहीतरी अर्थ जो त्याला प्रगट करावयाचा होता तो अर्थ त्याला कसा कसा प्राप्त झाला ? संवेदना जी होती ती अर्थवती होती का अर्थहीन होती. अर्थहीन जर असेल तर आमचा पक्ष मान्य ठरेल. अर्थवती जर मानिली तर तिला अर्थ कोणीं दिला व कसा प्राप्त झाला? ध्वनि अुत्पन्न करणाऱ्या प्राण्याने ध्वनि निर्माण झाल्यानंतर अर्थ दिला असें मानिलें तरी आमचा पक्षच मान्य ठरतो. ध्वनि निर्माण होण्याच्या पूर्वी प्राण्याने त्याला स्वतःच अर्थ देअून नंतर ध्वनि निर्माण केला असें म्हणावयाचें आहे काय ? असें असेल तर ध्वनीला किंवा संवेदनेला अमुकच अर्थ आहे असें त्याला कसें समजलें ? अितरांपासून समजलें असें मानिलें तरी आमचा पक्षच मान्य ठरतो. त्या संवेदनेला किंवा त्या आदौनिर्मित ध्वनीला अमुक अेक अर्थ समजावा हें त्या प्राण्यानेच स्वतः ठरविलें असें मानिलें तरी आमच्या पक्षाला बाधा होत नाही. कारण त्या विशिष्ट ध्वनीपुरता अमुकच अेक विशिष्ट अर्थ समजणें असें प्रस्थापित करण्याच्या परंपरेचा तो प्राणी आद्यजनक ठरेल अेवढेंच. हें झालें मूलभूत ध्वनीसंबंधी. अितर जे साधित ध्वनि किंवा मिश्र ध्वनि आहेत त्यांना अर्थ नंतर प्राप्त होतो हें अुघड आहे.

शिवाय हे मूलभूत ध्वनिसुद्धा मानवी मनोविकार प्रकट करणारे ध्वनीच तेवढे घेतले पाहिजेत; विचारप्रदर्शक मूलभूत ध्वनि येअून चालणार नाही. कारण विचारप्रदर्शक ध्वनींना भाषेची आवश्यकता असते. भाषेचें अस्तित्व असेल तरच मनुष्यप्राण्याला विचारक्रिया शक्य आहे, अेरव्ही नाही. भाषा नसतांना विकारक्रिया मात्र मानवी प्राण्याला शक्य असते. विकाराच्या किंवा भावनेच्या आवेगांत जे ध्वनि केवळ आपोआप अुत्स्फूर्त होतात त्या ध्वनींना नंतर त्या त्या भावनेचा दर्शक असा अर्थ प्राप्त होतो.

शिवाय माझ्या लेखांत मीं जो किंवा जे ध्वनि विचारासाठी घेतला किंवा घेतले आहेत ते निर्मितीनंतरचे आहेत हें अुघड आहे. निर्मितीच्या पूर्वी सर्व शरीरांत वावरणारा किंवा योगशास्त्रांत अभिप्रेत असलेला ध्वनि मीं विचारांत घेतला नाही. तो योगशास्त्राचा किंवा साक्षात्काराचा भाग आहे; भाषाशास्त्राचा नाही. ध्वनिनिर्मितीच्या पूर्वीच ध्वनीला अर्थ दिला जातो असें मानणें अीश्वरानेच भाषा निर्माण केली असें मानण्यासारखें आहे. भाषा ही अीश्वरकर्तृक संस्था नाही, मानवकर्तृक किंवा मानवसमाजकर्तृक संस्था आहे, हा सिद्धान्तच शास्त्रीय आहे.

अंडज, जारज किंवा अुद्भिज प्राणी ध्वनि निर्माण करतात हें खरें आहे. परंतु त्या ध्वनीचें अर्थाशीं साहचर्य प्रथम नसतें; तें त्या ध्वनीला पुढे समाजसंघर्पाने प्राप्त होतें. ते प्राणी जे ध्वनि निर्माण करतात ते सहज, स्वसमाधानार्थ, स्वसुखार्थ, आपल्या क्रीडाशक्ति ह्या ज़ातिक वृत्तीच्या समाधानार्थ निर्माण करतात; अमुक अेक विशिष्ट मनांत योजिलेला अर्थ प्रकट करण्यासाठी निर्माण करीत नाहीत. हे आद्य, मूलभूत ध्वनीसंबंधी मात्र आहे हें लक्षांत ठेवावें.

रामानंदयतींच्या लेखाला वरीलप्रमाणे अुत्तर आहे. लेखांतील विधान व तदनुपंगानें येणारे कांही अितर आक्षेप यांचाहि विचार जातांजातां केला आहे. कोणाला तर ही चक्रापत्तीच वाटेल. अर्थ अगोदर कां ध्वनि अगोदर ?

---

# जुन्या कागदपत्रांतील ७४॥ चा आंकडा

(लेखक— श्री. न. शे. पोहनेरकर)

गेल्या अंकांतील श्री. य. रा. दाते यांचा आणि ६२ व्या अंकांतील श्री. ना. गो. चापेकर यांचाहि अेतद्विपयी लेख वाचून बघितला. जुन्या कागदपत्रांतून येणारा ७४ चा हा आंकडा काय असावा यासंबंधी आम्हींहि कांही विचार करण्याचें ठरविलें. 'हू' हा अुर्दू शब्द लिहितांना तो ७४ झाला हें रा. दाते यांचें म्हणणेंहि लक्षांत घेतलें, परंतु समाधान होअीना. तेव्हा अुर्दू आणि फार्सी यांमधून आंकड्यांच्या कांही ठराविक किंमती असतात ही गोष्ट लक्षांत आली. यासंबंधी थोडासा कसून शोध तज्ज्ञांकडून व्हावा म्हणून आमचे साहित्यप्रेमी मित्र रा. गो. रा. माळखरे, बी. अेस्सी., यांच्या सहकार्याने तज्ज्ञ मौलवींच्या गांठी घेतल्या त्यांत बराचसा कांही खुलासा झाला तो आज प्रकाशित करूं या. अितिहासाभ्यासी बांधव यावर अवश्य विचार करतील अशी आशा आहे.

आमच्या मोंगलाअींत अजूनहि सरकारदरबारीं अुर्दू भापा जास्त आहे हें सर्वांना ठाअुक आहे. मराठींतून जेव्हा अेखादा कागद लिहिला जातो तेव्हा वर श्री लिहितात, परंतु अुर्दूतून जेव्हा एखादा कागद लिहितात तेव्हा मजकुराच्यावर ७८६/९२ असा आंकडा आजहि लिहितात. या आंकड्याने अर्थातच विचाराला वाव मिळाला. हाच ठराविक आंकडा कां लिहितात याचा शोध घेतांना असें कळलें की ७८६ म्हणजे 'बिसमिल्ला रहिमान् अुल् रहिम' आणि ९२ म्हणजे 'महंमद'. अेवढा धागा कळल्यानंतर प्रत्येक आंकड्यास कांही ठराविक गुण आहेत कीं काय याचाहि शोध घेतला असतां आंकडेवारी कळली ती अशी आहेः—

| | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अलीफ | बे | जीम | दाल | हे | वाव | जे | है | तोम | यी | काफ | लाम | मीम |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | २० | ३० | ४० |
| नून | सीन | अैन | फे | खाद | कॉफ | रे | शीन | ते | से | खे | | |
| ५० | ६० | ७० | ८० | ९० | १०० | २०० | ३०० | ४०० | ५०० | ६०० | | |
| जाल | ज्वाद | जोय | गैन | | | | | | | | | |
| ७०० | ८०० | ९०० | १००० | | | | | | | | | |

अशा प्रकाराने अुर्दू फार्सीच्या मूळाक्षरांना संकेताने किंमती दिलेल्या आहेत. यावरून आपण महमद हा शब्द ९२ चा आहे का हें आता पाहूं.—

महमद = मीम (४०) हे (८) मीम (४०) दाल (४) = ९२. अर्थात् या अशा किंमती ठरलेल्या असल्याने आणि फार्सीतून अशा आंकड्यांतून परमेश्वरी नांवें लिहिण्याची प्रथा असल्याने जुन्या कागदपत्रांतून अशी पद्धति आपणाकडेहि चालू केली असल्यास कांही नवल नाही व अशक्यहि नाही. ७४।। किंवा ७४।।= हा आंकडा मात्र असणें अशक्य आहे त्यापेक्षा श्री या अक्षराप्रमाणे आंकड्याच्याहि मागे पुढे ।। अशा रेषा देण्याचा प्रघात आहेच त्याच्या त्या रेषा समजणें जास्त योग्य होअील. ७४ हा आंकडा कोणत्या शब्दाची बेरीज आहे हा आता शोधून काढावयाचा प्रश्न आहे. ॐ किंवा अ + अु + म यांची या माहिती-प्रमाणे बेरीज केली तर १ + ६ + ४० = ४७ अशी येते. नुसत्या 'हू' या आंकड्याची ११ अशी बेरीज येते. अल्लाहू या आंकड्याची ४७ बेरीज येते. भवानी हा शब्द अुर्दूत लिहिला असतांना त्याची बेरीज ७४ अशी येते. गजानन याची बेरीज १२० अशी येते. श्रीची बेरीज ५१० अशी येते. अशा प्रकारें निरनिराळे शब्द लिहून पाहून कुलदैवतें कोणतीं त्यांचीं नांवें काय तें शोधून आंकड्यांची बेरीज जमविली तर मनोरंजक असा हा प्रश्न सुटणें कांही अशक्य नाही. ४७ हा आंकडा ॐच्या अैवजी आणि ७४ हा आंकडा भवानी या अर्थी आपणांस या किंमतीवरून दिसतो. अर्थात् कागदपत्रांतून हा आंकडा स्वस्तिदर्शक आहे असें म्हणण्यास कांही हरकत नाही. रा. दाते यांच्या मताने पाहतां मूळ अुर्दूचा ह हा मराठी ४ सारखा असला तरी जेव्हा त्याला व जोडला जातो तेव्हा तो ,४ असा जोडून लिहीत नाहीत. ह ची मूळ आकृति जरी ४ शी सारखी असली तरी लिहितांना आणि जोडतांना ती बदलते व हा हू शब्द ७४ होण्यासारखा राहत नाही. ,७ असा तो बनतो. हें अुर्दू लिहिणाऱ्या तज्ज्ञ बांधवांना समजेल.

७४ या आंकड्यासंबंधी अनेक आख्यायिकाहि आहेत व त्या यासंबंधीच्या दोन लेखांत आल्याहि आहेत. जानव्यांचें वजन ७४ मण नसून १४ होतें आणि तेंहि हळदी-घाटाच्या लढाअीत अशी माहिती मिळते. व म्हणूनच आजहि जातिवंत रजपुतांत हा आंकडा 'राखी' अितकाच महत्त्वपूर्ण मानण्याची पद्धति आहे. या चौदाच्या आंकड्यापासूनहि ७४ चा आंकडा लिहिणाऱ्याच्या खर्डेघाशींत निर्माण होणें अशक्य नाही. मात्र तो अुर्दूच्या ह आणि वावपासून निघतो असें म्हणतां येणार नाही.

आता समक्ष सर्व किंमती ठेविल्या गेल्या आहेत. संस्कृत भाषेंतूनहि शके तिथि वगैरे लिहिण्यासाठी शब्दांना सांकेतिक अशा आंकड्यांच्या किंमती आहेत. जुन्या श्लोकांतून असे आलेले अुल्लेख अनेकदा आढळतात. त्याहि दृष्टीने या आंकड्यांकडे पाहणें योग्य होअील.

संशोधक बांधवांना विचाराची अेक दिशा सुचविण्यापलीकडे या छोट्या लेखाचें कांही प्रयोजन नाही. आमच्या येथे ही अशी माहिती आजहि आहे अितकेंच नव्हे तर अुच्चवर्णी-यांतहि फार्सी भाषेंतून काव्यनिष्पत्ति करणारे विद्वान आजलाहि तुरळक आढळतात. कोणत्याहि वेळीं का असेना ही अशी किंमतीची माहिती जंत्रीप्रमाणे अुपयोगी पडते. अजूनहि कांही आंकडे यांत देण्याचे राहिले आहेत. तेहि पुढें मागे प्रसिद्ध करूं. परंतु ही शब्द व आंकड्यांची काटाकूट व बेरीज करीत बसणेंहि चांगलेंच मनोरंजक होअील म्हणून आज जी माहिती हाताशीं आली ती प्रसिद्ध केली आहे.

---

अनुक्रमणिका

## परीक्षणें

### शास्त्र

**प्रकाशलेखनशास्त्रांतील आश्चर्यें—** लेखक व प्रकाशक श्री. अ. का. दामले, बी.एस्सी., शास्त्री पोळ, बडोदें; मूल्य दोन रुपये.

स्वतः संकल्पिलेल्या विज्ञानमालेंतील प्रथम पुष्प 'यांत्रिक शोधांच्या नावीन्यकथा' हें १९४० सालीं प्रकाशित करून, यंदाच्या सालीं श्रीयुत दामले यांनी वर अुल्लेखिलेलें द्वितीय पुष्प प्रकाशित केलें आहे. अलीकडे पैगाडी, शिवणयन्त्र, गायन्त्र (फोनो), टपकणी (टैप-रायटर), निकाश (फोटो) अशांसारख्या वस्तूंचा प्रचार अतोनात वाढत चाललेला आहे; यांपैकीं कोणतीहि अेखादी वस्तु पाहिली तर थोडासा विचार करणाराच्याहि मनांत आल्या-शिवाय राहत नाहीं कीं 'वस्तु किती साधी पण तिची करामत किती मोठी!' या आश्चर्य-भावनेचा अुपयोग करून घ्यावा आणि शास्त्रांच्या नि कलांच्या रोखानें जिज्ञासूला न्यावयाच्या वाटा तरी रमणीय करून सोडाव्या असा प्रस्तुत मालेचा अुघड हेतु दिसतो. ज्यानें हीं दोन्ही पुष्पें पाहिलीं आहेत त्याला पहिल्यापेक्षा दुसरें अधिक सरस निघालें आहे असेंच वाटेल; आणि मालेंतील पुष्पांची प्रगति अशीच अुत्तरोत्तर अधिक होत राहिल्यास मालेचा हेतु चांगलाच सिद्धीस गेला असें म्हणतां येअील. छपाई, चित्रें, बांधणी अित्यादि पाहतां हें पुस्तक सुबक झालें आहे; या बाह्यांगप्रशंसेवरून अन्तरंग तितकेंसें आकर्षक नाहीं असा मात्र कोणीं तर्क करूं नये. अन्तरंग पाहतां, प्रथम डॉक्टर कापरे यांनी लिहिलेला छोटासा विषयप्रस्ताव, मग ग्रंथकर्त्याचें निवेदन आणि पुढे प्रस्तुत विषयांतील आश्चर्यांची द्वादशभागात्मक संगतवार सरस मांडणी अशी रचना सुटसुटीतपणें केलेली दिसून येते. या द्वादशभागांतील वर्ण्यविषय, कवीच्या शब्दांत सांगावयाचा झाल्यास, 'केला रवि चित्रकार मनुजानें!' हा असून अेकेका कल्पकाला अेकेक कल्पना कशी सुचत गेली, कल्पकामागून कल्पक पुढे येऊन त्यांनी आपा-पल्या कल्पनाबीजांना महोद्योगाचें पाणी घालघालून प्रकाशलेखनाच्या अुद्यानांत मनोहर वृक्ष आणि विविध लता कशा वाढविल्या हा वृत्तान्त, अधूनमधून जरा चटकदार मापा घालून, ग्रंथ-कर्त्यानें मांडला आहे. ग्रंथकर्त्यानें शैली आदरिली आहे ती अशी कीं नाना कल्पना, विविध युक्त्या यांचे अुपयोग वर्णावे, त्यांतील मौजा सांगाव्या आणि अेतद्द्वारा वाचकांमध्ये भौतिक शास्त्रें नि कला यांचें ज्ञानविज्ञान प्रसृत करावें. आपल्या मराठीला अवश्य लागणाऱ्या असल्या प्रकारच्या वाङ्मयांत प्रस्तुत पुस्तकानें चांगली भर पडली आहे.

प्रस्तुत पुस्तकाचा हेतु, विषय आणि तो मांडण्याची रीति यांसंबंधीं वरप्रमाणे प्रशंसा केल्यानंतर असें म्हटल्याशिवाय मात्र राहवत नाहीं कीं पुस्तकांत मराठी भाषा आणि परि-भाषा याविषयीं फारच वैगुण्यें राहून गेलेलीं आहेत. मराठींतून भौतिकशास्त्र बोलणारे लोक विरळा; अशा स्थितींत जे चार-दोन 'भौतिक'– मराठीभक्त– बोलणेंलिहिणें मराठींतून करतात ते अभिनंदनास पात्र, यांत कांहीं शंका नाहीं. तथापि याचा अर्थ असा असतां कामा नये कीं

त्यांनी भाषा अशुद्ध, शिथिल, गुंतागुंतीची, मराठीची आत्मता (ओडियम) बिघडविणारी अशी लिहिली तरी चालेल. त्याचप्रमाणे हेंहि निश्चित की ग्रंथकर्त्याने पारिभाषिक संज्ञांची विस्तृत आणि सुव्यवस्थित अशी रचना आपल्या संग्रहीं आणून त्या त्या संज्ञा त्या त्या ठिकाणीं चांगल्या विवेचकपणेंच वापरल्या पाहिजेत. नाही तर— शास्त्रीय तें सुव्यवस्थितच असलें पाहिजे, तें संकुल कधीहि असतां कामा नये, हा दण्डक मोडत आहे; आणि आपल्याकडून अनवस्था-अव्यवस्था, अजाणतां का होईना, निर्माण होत आहे, असें ग्रंथकर्त्यांने ध्यानांत ठेविलें पाहिजे. शुन्य नव्हे शून्य, उर्मि नव्हे ऊर्मि, जटील नव्हे जटिल, हें काय परीक्षणांत दाखवून देण्याची आपणावर पाळी यावी ? आपण शुद्धतेच्या बाबतींत आवश्यक तेवढीहि दक्षता बाळगली नाही असें म्हणण्याचा प्रसंग कां येऊं द्यावा ? तसेंच, आकृति आणि आकार, द्रव्य आणि पदार्थ, उष्णता आणि तपमान, रंग आणि वर्ण— अितकें तरी कशाला, पान आणि पृष्ठ ही साधी जोडीच का घ्या ना— यांमधील भेद सुसंगतपणें आपणांकडून कां पाळला जाऊं नये ! बलून आणि अेअरोप्लेन यांमध्ये फरक आहे हें जाणून पहिल्याला विमान आणि दुसऱ्याला वियान अशी व्यवस्था केलेली आपण मानिली, तर बलून आणि विमान अशी हेंगाडी जोडी वापरून कशीबशी वेळ मारून नेण्याचा जो प्रसंग येतो तो आपण 'मौतिक' लेखकांनी टाळावयास नको काय ? प्रस्तुत पुस्तकांत 'अनावर्तन' असा शब्द अिथून तिथून अेक्सपोझर या अर्थी वापरला आहे ! 'अनावर्तन' याचा तर वास्तविक अर्थ 'आवर्तनाचा म्ह. पुनरावृत्तीचा अभाव'. अर्थात्, अुघडीक किंवा अुपकाशन असे शब्द या ठिकाणीं वापरावयास हवे होते; ते वापरावयाच्या अैवजी अनावर्तन शब्द वापरून मराठी वाङ्मयाला विनाकारण दूषण नाही का आपण आणीत ? तेव्हा आमची या बाबतींत— म्हणजे भाषा आणि परिभाषा या बाबतींत— प्रेमाग्रहाची अशी नम्र सूचना आहे की साहित्यपरिषदेची मदत लेखकांनी अवश्य घ्यावीच. साहित्यपरिषदेने शुद्धलेखनाचे नियम व्यवस्थित बांधून दिलेले आहेत ते आदरावे; त्याचप्रमाणे साहित्यपरिषदेच्या संग्रहीं पारिभाषिक संज्ञावलीहि आहेत त्यांचें परिशीलन करून त्या अुपयोगांत आणाव्या.

आता खाली कांही कांही अुदाहरणें संक्षिप्तपणें आमचें म्हणणें स्पष्ट करण्यासाठी देत आहों:—

| पृ. | आहे | शेरा | तेथे पाहिजे होते |
|---|---|---|---|
| २१ (११) | आयोडीन | ही चूकच आहे | आयोडाअीड |
| ६५ (२१) | क्षम्य | शब्दांची भूल | क्षम |
| ९५ (१) | ऑर्गन | विकृति अक्षम्य | आर्गन |
| अिथून तिथून सगळीकडे | अनावर्तन | भलताच शब्द | अनावरण |
| १२६, १३२, १४४ | अनावृत्त | ,, | अनावृत |

ओंगळ, बाटगे आणि व्याकरणविरुद्ध प्रयोग:—

| | |
|---|---|
| १३ | शोधांचे जलदीकरणास कारणीभूत |
| ३८ | ते सप्तरंगी किरणांत वेगळे होतात. |
| ३८ | भिंगाच्या प्रकाशकिरणें विकरण करण्याच्या धर्मामुळें |
| १४४ | कॅमेरा बरोबर याच दिशाभिमुख राहील |

खाली कांही वाक्यें अुदाहरणार्थ घेअून त्यांची सुधारणा कंसांत [ ] सुचविलेली आहे; त्यावरून मूळ वाक्यांत अनगडपणा कसा आणि किती आहे हें ध्यानांत येअील.

**अंधेरी पेटी व असल्या भिंगामुळें** अेकाच तऱ्हेचा चमत्कार करतां येतो, तेव्हां अेकाची दुसऱ्यास जोड दिल्यास **जास्त अुत्तम** प्रतिभा मिळतील ही कल्पना...पृ.५. [अंधेरी पेटी आणि असलें भिंग यांमुळें... अधिक चांगल्या...].

ह्या दरम्यान त्याची पुढें **प्रख्यात पावलेल्या** रसायनज्ञ सर हम्फ्रे डेव्हीशीं मैत्री जमली. पृ. १४. [दरम्यान असें झालें कीं पुढें मोठीच ख्याति पावलेला रसायनज्ञ जो... त्याच्याशीं याची मैत्री जमली].

तो जवळ जवळ **शुन्य तीव्र** असेल. **मधल्या जातींचे ढगांच्या प्रकाशाची** तीव्रता, तीव्र प्रकाश व निबिड अंधार (अर्थात् **शुन्य** प्रकाश) यांचे दरम्यान असेल. पृ.१७. [...तीव्रतेंत शून्यच असेल. मधल्या जातींच्या ढगांची प्रकाश-तीव्रता पाहिली तर...]

ह्याचा फायदा त्यानें पुढीलप्रमाणें घेतला व आजच्या **जस्ती** व **तांब्याच्या** टसे करण्याच्या पद्धतीचा पाया घातला. पृ. १८. [जस्ताचे आणि तांब्याचे ठसे करण्याची आज जी पद्धत प्रचलित आहे तिचा...]

डाग्यूर कोणी तरी लबाड मनुष्य असून आपल्याकडून आपल्या शोधांची माहिती काढूं अिच्छीत आहे असा त्याचा ग्रह अितर अनेक पत्रें त्यास येत, त्यांवरून झाला असावा. पृ.२०. [स्वल्पविराम दिला आहे तिथे नको असून, 'ग्रह' या शब्दापुढे अेक आणि 'त्यांवरून' या शब्दापुढे दुसरा; असे दोन स्वल्पविराम पाहिजे आहेत. अेकंदरींत, विरामचिन्हांचा दुरुपयोग आणि अत्युपयोग हे दोनहि दोष परीक्ष्य पुस्तकांत विपुलपणें आहेत.]

कांही पदार्थ असे असतात कीं, ज्यांच्यावर प्रकाश पाडला व नंतर जरी तो काढून घेतला, तरी ज्या ज्या ठिकाणीं प्रकाश पडलेला असतो, त्या त्या ठिकाणचे भाग चमकूं लागतात. पृ. १९. [...कीं त्यांच्यावर प्रकाश पाडला आणि तो काढून घेतला; तरी ते स्वतःच चमकत राहतात].

**सुदैवानेंच म्हटलें पाहिजे**, त्या वेळेपासून त्यांच्या मनांत ज्या ज्या विचारलहरी अुत्पन्न झाल्या त्या त्या त्यानें आपल्या दैनंदिनींत लिहून ठेवल्या आहेत. पृ.२९. [हें सुदैवच म्हटलें पाहिजे कीं...].

स. वि. आ.

## साहित्यशास्त्र

**कलेचीं क्षितिजें**— लेखक श्री. प्रभाकर पाध्ये; प्रकाशक श्री. दा. ना. मोघे, स्कूल अॅन्ड कॉलेज् बुकस्टॉल, कोल्हापूर; मूल्य दोन रुपये.

सदर पुस्तकांत धनुर्धारीचे संपादक रा. प्रभाकर पाध्ये यांनी वेगवेगळ्या निमित्तांनी लिहिलेले वाङ्मयचर्चात्मक लेख अेकत्रित करण्यांत आलेले आलेले आहेत. प्रो. वामनराव जोशी, जावडेकर, काणेकर, पु. य. देशपांडे वगैरेंचीं अध्यक्षीय भाषणें, प्रस्तावना वगैरेंचें परीक्षण करण्याच्या निमित्तानें हे सर्व लेख धनुर्धारी साप्ताहिकांत येअून गेले होते. अर्थात् यांचें स्वरूप 'समालोचनाचें समालोचन' असें सांगतां येअील. रा. पाध्ये यांनी परीक्षिलेल्या मूळ लेखांत बरेच मूलगामी आणि वादग्रस्त मुद्दे अुपस्थित झालेले होते. रा. जावडेकर

आणि रा. देशपांडे यांनी मार्क्सवाद, पुरोगामित्व आणि ललितवाङ्मय यांसंबंधी खोल आणि मूलगामी विवेचन केलें होतें. वामनराव जोशी यांनी वाङ्मयीन महात्मता या पुस्तकाची प्रस्तावना लिहिण्याच्या निमित्ताने ललितवाङ्मयाचा अुद्देश आणि अुगम याच्यासंबंधी खोल व सुबोध चर्चा केलेली आढळेल. काणेकरांनी पुरोगामी दृष्टिकोन संभाळूनहि कलेचें वैशिष्ट्य आणि स्वातंत्र्य यांची तरफदारी केलेली होती. या सर्व महत्त्वाच्या विवेचनांचें विस्तृत आणि खोल परीक्षण रा. पाध्ये यांच्या सदरहू पुस्तकांत सांपडेल.

रा. पाध्ये यांनी परीक्षणार्थ घेतलेल्या विविध विवेचनांशीं त्यांचें स्वतःचें पुष्कळसें मतैक्यच आहे. रा. देशपांडे आणि काणेकर यांजसारख्या पुरोगामी असून यांत्रिक नसलेल्या साहित्यिकांशीं कोणाहि साहित्यिकाचा फारसा मतभेद होण्याचें कारणच नाही. तथापि मूळ विवेचनांतील कानेकोपरे साफ करण्याच्या दृष्टीने, तसेंच त्यांच्याच प्रश्नांना थोडें अधिक पुढे खेचण्याच्या दृष्टीने आणि त्याबरोबरच प्रसंगीं त्यांचा अपुरेपणा दाखविण्याच्या दृष्टीने रा.पाध्ये यांचे हे लेख फार अुपयुक्त ठरतील. रा. पाध्ये धंद्याने साप्ताहिकसंपादक आणि विद्येने राजकारणी शाखेचे असतांहि वाङ्मयीन प्रश्नांत त्यांनी अितकें लक्ष घातलें, त्याकरिता त्यांनी अितके जुने नवे पाश्चात्य साहित्यमीमांसक हाताळले ही कौतुकास्पद गोष्ट होय. त्यांतल्या त्यांत विशेष आनंदाची गोष्ट म्हणजे अलीकडच्या बऱ्याच चर्चालेखनांत पढिकतेच्या पाटाखणीस दिसून येणारी अरसिकता त्यांच्या लेखनांत दिसून येत नाही. ते रिचर्ड्स, रॉजर फ्राय्, ट्रॉट्स्की यांचे हवाले देतात कीं नाही यापेक्षा त्यांच्यांत ललितवाङ्मयाचें रहस्य पारखण्यास लागणारी रसिकता आहे कीं नाही याला आमच्या मतें अधिक महत्त्व आहे. आनंदाची गोष्ट म्हणजे त्यांचा दृष्टिकोन सामान्यतः आणि मूलतः निकोप आहे.

कला आणि मतप्रचार यांचें रा. पाध्ये यांनी दाखविलेलें नातें अगदी बरोबर आहे. सामान्य महाराष्ट्रीय मार्क्सवाद्याहून रा. देशपांडे यांची या बाबतींतील दृष्टि निर्दोष आहे; आणि रा. पाध्ये यांची दृष्टि रा. देशपांडे यांच्या दृष्टीहूनहि अधिक निर्दोष आहे. मार्क्सवाद्यांनी कलेच्या प्रांतांत, विशेषतः वाङ्मयाच्या प्रांतांत, लक्ष घालण्यास सुरुवात केली, तेव्हापासून कलेंतील मतप्रचाराच्या मर्यादा जाणत्या साहित्यिकांनी अनेकदा दाखविल्या आहेत. आता देशपांडे, पाध्ये यांजसारख्या मार्क्सवादी विवेचकांसहि कलेचें स्वरूप अधिकाधिक ध्यानीं येअूं लागलें आहे हें सुचिन्ह होय. बोधवाद आणि आनंदवाद हाहि थोड्याशा परिमापामेदाने सदर पुस्तकांत आला आहे. रा. पाध्ये यांचा या बाबतींतीलहि दृष्टिकोन साहित्यिकांस मान्य होण्यासारखाच आहे. ते प्रचारकी वाङ्मयाचे भोक्ते नाहींत हें लक्षांत घेतां ते बोधवादापेक्षा आनंदवादाकडे झुकतील हें अुघड आहे. आणि कित्येक समजतात त्या अर्थाने बोधवादाकडे पाहिल्यास बोधवादाने साहित्याची हानीच होअील असें दिसून येअील. पण रा. पाध्ये यांच्यासारख्या तरुण आणि चिकित्सक लेखकास चालू वादाच्या परिभाषेने बिचकण्याचे कांहीच कारण नव्हतें. वाङ्मयांतील 'संदेश' म्हणजे 'राणा भीमदेवी' पद्धतीचा ठाम आणि अुघड नीतिबोध असें समजण्याचें त्यांस कांहींच कारण नव्हतें. अनुभवांत रंगून जाणें हेंच कलेचें रहस्य आणि कलावंताचें वैशिष्ट्य असलें, आणि अुत्कृष्ट कलाकृति रसिकांस कार्यप्रवृत्त करण्याचा अुद्देश पुढे ठेवून लिहिली जात नसली, तरी कलाकृतीच्या प्रत्यक्ष हेतूपेक्षा आणि तात्कालिक परिणामापेक्षा तिचे सूचित आणि अप्रत्यक्ष परिणामच अधिक महत्वाचे असतात. कवि (साहित्यिक) कशांत आनंद पावतो यावरून त्याच्या क्रियाविषयक, आचारविषयक, जीवनविषयक् आकांक्षा सहजच सूचित होतात. रसिक (वाचक) अेखाद्या वाङ्मयकृतींत आपल्या जीवन-

विषयक दृष्टिकोनाला धक्का न लावतां गुंग होऊं शकेल असें म्हणणें कठीण आहे. कवींच्या आणि रसिकांच्या गुंग होण्यास, आनंदस्वादासहि, अर्थ—Significance—असतो. अर्थात् कलाकृतीस आणि कलास्वादास व्यावहारिक फळें (practical consequences) आल्यावांचून रहतील असें समजणें हें अेक अवास्तव तरी होअील किंवा केवळ क्षीणबल कलाच तेवढी जमेस धरून बोलण्यासारखें तरी होअील. बोधवादाचा चालू महाराष्ट्रीय अर्थच केवळ न घेतां जे सूक्ष्म अर्थ घेतात त्यांस कोणतेंहि थोर लिखाण संदेशविहीन असूं शकेल हें मान्य होणार नाही. अर्थात् कला प्रत्यक्षतः बोधकारी नसली तरी आपल्या कलेला होणारीं नैतिक अपत्यें कलावन्तास नाकारतां येत नाहीत. कलाविलास हा या अपत्याच्या अपेक्षेने नसतो; पण सामाजिक परिणामरूपी अपत्य हें त्यांचें अपरिहार्य फळ असतें, असें हें कलानीतिवादाचें द्वंद्वात्मक (Dialectical) स्वरूप आहे. रा. जावडेकर आणि रा. काणेकर यांच्या भाषणांसंबंधीहि रा. पाध्ये यांनी मार्मिक विचार व्यक्त केले आहेत. रा. काणेकर यांनी अेमिल झोला याच्या ज्या कृतींचा गौरव केला आहे ती साहित्यांत मोडत नसून व्यावहारिक धाडसांत आणि पराक्रमांत मोडते हें रा. पाध्ये यांनी बरोबर ओळखलें आहे. साहित्यपत्रिकेंत सदर भाषणावर लिहितांना 'व्यावहारिक सत्य आणि वाङ्मयीन सत्य' 'नैमित्तिक सत्य आणि नित्य सत्य' यांतील अंतर काणेकर यांनी ओळखलें नाही हें झोलाच्या ड्रेफूस प्रकरणावरूनच प्रस्तुत लेखकानें दाखविलें होतें.

रा. जावडेकर यांचें ब्रह्मशास्त्रप्रधान असें पुरोगामित्वविवेचन रा. पाध्ये म्हणतात त्याप्रमाणे अपुरें वाटतें हें खरें. तथापि अध्यात्मवादाच्या दृष्टीने पुरोगामित्व म्हणजे काय हें समजावून घेण्याचीं साधनें अस्तित्वांतच नाहीत असें नाही. रा. जावडेकर यांच्या विवेचनांतील अपुरेपणा दाखविला म्हणजे यच्चयावत् अध्यात्मवादी दृष्टिकोनांतील दोष सिद्ध झाला असें होत नाही. "धर्म आणि मोक्ष यांना आधारभूत अशी मानवी प्रेरणा कोणती ?" असा रा. पाध्ये यांचा सवाल आहे. अशा रीतीने धर्म आणि मोक्ष यांचें शास्त्रीय अधिष्ठान काढून घेतां येतें अशी कल्पना केली तरी "अर्थ आणि काम या शास्त्रसिद्ध प्रेरणांनी जीवनाची संपूर्ण संगति लागते काय ?" असा अुलट सवाल करतां येअील. आणि अखेर प्रगतीची व्याख्या न करतां प्रगतीची मापा बोलणारांच्या पंक्तींत रा. पाध्ये यांसहि बसावें लागेल. रा. पाध्ये यांनी प्रगतीचें स्वरूप सांगण्याचा प्रामाणिक व निकराचा प्रयत्न (पृष्ठ १०७ वर) केला आहे. पण जडवादांतील मूलभूत दोष त्यांत 'आनुवंशिकतया' शिरले आहेत. प्रगतीची भाषा काढणारांस मूल्यांचा प्रश्न टाळून चालत नाही. आणि मूल्यांचा प्रश्न अशास्त्रीय नसला तरी रा. पाध्यांना मान्य असलेल्या शास्त्रांनी तो सुटण्यासारखा नाही. मूल्यांचा प्रश्न न काढल्यास प्रगतीची कल्पना 'विस्तार', 'नवी जाणीव' वगैरे मोघम शब्दांच्या पलीकडे जात नाही.

रा. पाध्ये यांनी कलेच्या क्षेत्रांतील अनेक वादग्रस्त प्रश्नांची चर्चा मोठ्या परिश्रमपूर्वक केल्याचें सदर पुस्तकांत दिसून येअील. कलेच्या क्षेत्रांतील अनेक जटिल प्रश्न घेअून 'चिंचरून' काढणें हें गेल्या दहा वर्षांतील साहित्यचर्चेचें वैशिष्ट्य होय. सूक्ष्म आणि शास्त्रीय विवेचन ही गोष्ट स्वभावतःच अितकी आकर्षक आहे की तिच्या औचित्याकडे आणि फलश्रुतीकडे पाहण्याचें भान बुद्धिप्रधान युगांत राहत नाही. तथापि दोन भिषग्वर्यांचा वाद म्हटला तरी रोग्याचेंच मान राहीनासें झाल्यास त्या वादास केवळ शब्दच्छलाचें रूप आल्याशिवाय राहणार नाही. या दृष्टीने कलामीमांसेंतील प्रश्न हे कलानिर्मितींतून किंवा निदान कलास्वादांतून तरी सुचलेले पाहिजेत. म्हणजे त्यांस अधिक जीवंतपणा आणि अधिक वास्त-

वता येईल असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे. कलेचें अधिष्ठान जीवन असणें जितकें आवश्यक तितकेंच कलामीमांसेचें अधिष्ठान कला असणें आवश्यक होय. आमची मीमांसा ही कलेच्या अनुभवांतून आणि चिंतनांतून निघण्याऐवजी मीमांसेच्याच वाचनांतून निघत आहे. जीवनाशींच नव्हे तर कलेशींहि जिचा निकट संबंध नाही अशा तऱ्हेची कलामीमांसा वाढण्याने पूर्वीच्या 'घटपटां'च्या लटपटीचें युग (राजदरबार नसल्याने) वृत्तपत्रांच्या आसऱ्याने फिरून उगवेल कीं काय अशी भीति वाटते. पण ही भीति वृथा किंवा फार दूरची नव्हे हें सदर पुस्तकाची प्रस्तावना वाचतांच दिसून येईल. अशा प्रकारचें लिखाण लिहिलें जाण्यास व प्रकाशिलें जाण्यास 'दुर्बोधतेविषयींची जन्मजात आवड' याखेरीज कोणतेंहि कारण दाखवितां येणार नाही. कदाचित् दुर्बोधता म्हणजे सूक्ष्मता किंवा गहनता अशी अलीकडे कांही मंडळींनी समजूत करून घेतली असावी. याहून सूक्ष्म विचार मराठींत फारच सुगम भाषेंत प्रसिद्ध झाले आहेत व होत आहेत. मग भाषेची ही विटंबना आमचे लहान मोठे साहित्यिक उघड्या डोळ्यांनी कां गोड करून घेत आहेत हें सांगतां येणें कठीण आहे. विटंबना शब्द आम्हीं बुद्ध्याच वापरला आहे. जें सहज सांगतां येईल तें बोजड करून सांगणें ही देखील भाषेची विटंबना समजली पाहिजे; पण तें ओखाद्यास ज्ञात नसल्यास बोजडपणाच्या झापडीमुळे साधे व्याकरणाचे नियमहि कसे दिसेनासे होतात हेंहि या प्रस्तावनेंत दिसून येईल. 'दुर्दम्य डरकाळीने शेवटी आपटणारा वनराज', 'संज्ञाशक्तीच्या कळीची ओकेक पाकळी उमलून तिच्या विकासाच्या प्रफुल्ल सूर्यफुलावत् दिसणाऱ्या या रमणीय शोभेने', 'तत्त्व ज्ञानाच्या फार खोलींत न शिरतां', 'ललितवाङ्मयाऱ्याच केवळ अभ्यासावर सबंध कलांचें स्वरूप ठरविणें', 'त्या संज्ञाशक्तीचे व्यापार किंवा तिची जाणीव विवक्षित ज्ञानेंद्रियांत केंद्रीभूत होत नसत' या शब्दसमूहांतील व्याकरणाचे व वाक्प्रचाराचे दोष अन्यथा सदर विद्वान प्रस्तावनालेखकाने केले नसते.* दुर्बोधतेचीं उदाहरणें, ओकहि उदाहरण, येथे दिल्यास मोठी जागा लागेल. तरी लांबलचक नसलेलीं अशीं जीं अपवादादाखल वाक्यें सदर प्रस्तावनेंत आहेत त्यांतील ओक देतों— 'मेघदूतापूर्वी कालिदासाचं प्रणयक्रीडाशून्य, निदान विरही चित्र संस्कृताचे प्राध्यापक काढूं शकतील' या वाक्याचा अर्थ ? याच प्रस्तावनेंत 'आपलं संस्कृतचं अध्ययन' 'कुणी सांगावं' अशीं घरगुती रूपें आहेत; जागजागीं विनोदाचा प्रयत्न आहे; मधून मधून 'जरा सूर वर लागला! खालच्या सप्तकांत उतरूं या' असें म्हणत विचाऱ्या मंदमति वाचकास संभाळून घेण्याचाहि प्रयत्न आहे; तर 'याहून खोलांत अिथें शिरतां येत नाहीं' असें म्हणत सदर मीमांसागव्हरांत याहूनहि निबिड अंधार आहे असा बागुलबुवा वाचकांस दाखविला आहे. अितक्या घरगुती आणि आंजारणीगोंजारणीच्या 'मूड'मध्येहि रा. मर्ढेकर यांस याहून सोपें लिहितां येत नसेल तर त्यांच्या स्नेह्यांनी खरोखरीच त्यांस अन्य भाषेचा अगर हायरोग्लिफिकपासून तों फ्यूचरिस्ट आटपर्यंत कोणत्याहि निराळ्या माध्यमाचा आश्रय करण्यास सांगावें ! पद्याचे गोड पाश तोडून गद्याच्या स्वैरसंचारास निघालेल्या बिचाऱ्या

* तसेंच या प्रस्तावनेंतील "समुद्रांतून पाणी कापीत जाणारी शार्कनक्रादि धुडें" या शब्दप्रयोगांतील 'शार्क' शब्दाने कोणता प्राणी अभिप्रेत आहे हें देव जाणे ! संदर्भावरून पाहतां 'शार्क' म्हणजे नक्रासारखाच कोणी जलचर असावा असा तरी लेखकाचा समज असावा; नाही तर कोणताच स्पष्ट पदार्थ डोळ्यापुढे नसून पदलालित्याच्या ओढीमुळे कांहीतरी शब्द वापरला गेला असावा. तसें असल्यास "कलात्मक अभिमान" तर राहोच पण साधें शब्दार्थांचें भिमानहि येथे राखलें गेलें नाही असें म्हटलें पाहिजे. लेखकाच्या मनांतील अभिप्राय कळून माझें मत बदलावें लागल्यास मला आनंदच होईल.

श्री. के. क्षी.

मराठी भाषेच्या गळ्यांत त्यांनी हे पढिकतेचे पाटेवरवंटे बांधूं नयेत अशी त्यांस सर्व भाषा-भक्तांची काकुळतीची विनंती आहे.

रा. मर्ढेकरांचा प्रस्तुत लेखकाला जो अत्यल्प परिचय आहे त्यावरून ते विद्याप्रेमी व विनीत आहेत असा त्यांचा समज आहे. कोणत्या विकृत कल्पनेच्या आहारीं जाऊन त्यांच्या हातून अशाप अशा मायभाषेची अशी नुकसानी घडत आहे हें शोधून काढणें हें रा. पाध्ये यांच्यासारख्या त्यांच्या अधिक निकटच्या मित्रांचें कार्य आहे. तूर्त तरी ही मित्रमंडळी भाषे-संबंधीहि कर्तव्य विसरत आहेत व मित्रासंबंधींचेंहि कर्तव्य टाळीत आहेत असें म्हटल्यावांचून अिलाज नाही !

श्री. के. क्षी.

## ग्रंथसंपादन

१ **श्रीचक्रधरोक्त सूत्रपाठ**— संपादक ह. ना. नेने; प्रका० कुंवर राजकुमारी बाबू गोविंद सहायतर्फे महानुभाव समाज, श्रीदत्तात्रेय ज्ञानभुवन, जुनी मंगळवारी, नागपूर; मूल्य २। रु.

२ **नागेशकृत सीतास्वयंवर**— (पाठ संशोधित प्रत) संपादक डॉ. माधव गोपाळ देशमुख; प्रका० सुविचार प्रकाशन मंडळ लिमि., नागपूर; मूल्य १ रु.

मराठी भाषेच्या आणि वाङ्मयाच्या अभ्यासकांना सांकेतिक लिपींत लिहिलेल्या महानुभावीय वाङ्मयाचा परिचय करून देणारे जे कांही थोडे संशोधक विद्वान आहेत त्यांत श्री. ह. ना. नेने यांचा प्रामुख्याने अुल्लेख करणें जरूर आहे. कै. राजवाडे, कै. वि. ल. भावे, श्री. भवाळकर, चांदोरकर, य. खु. देशपांडे, वा. ना. देशपांडे, प्रो. कोलते, श्री. नेने अित्यादि विद्वानांच्या परिश्रमाने महानुभावीय पंथ, महानुभावीय वाङ्मय, महानुभावीय तत्त्वज्ञान अित्यादींवर दिवसेंदिवस अधिकाधिक प्रकाश पडत गेला आहे. महानुभावांना औरंगजेबाच्या कारकीर्दींत मिळालेली जेजिया कराची माफी वगैरेसंबंधाने जे कांही गैरसमज झाले होते त्यांचेंहि अलीकडे निरसन झालें आहे. महानुभावीय वाङ्मयाची टोलेजंग अिमारत कांही अेका विशिष्ट तत्त्वज्ञानावर आधारली गेली आहे. हें तत्त्वज्ञान चक्रधरांनी आपल्या शिष्यांना केलेल्या अुपदेशांत सामवलेलें आहे. चक्रधरांचीं प्रवचनें सूत्रबद्ध असत. या सर्व सूत्रांचें संकलन चक्रधरांचे शिष्य नागदेवाचार्य यांच्या समक्ष केशिराजव्यासांनी केलें. त्यानंतर रामेश्वरव्यास व परशुरामव्यास यांनीहि कांही सूत्रें संकलित केलीं.

सूत्रपाठाची प्रसिद्धि सांकेतिक लिपींतून पंथीय लोकांसाठी जरी झाली होती तरी १९१५ मध्ये राजवाड्यांनी 'लक्षणान्वयपाठ' छापला आणि १९३१ मध्ये भवाळकर आणि नेने यांनी 'चक्रधरसिद्धांतसूत्रें' यांची सटीप आवृत्ति छापली. परंतु ही आवृत्ति संशोधन-पद्धतीचा अवलंब करून झाली नव्हती. त्यानंतर श्री. नेने यांनी स्वतः सूत्रपाठाच्या अनेक पोथ्या, त्यांवरील भाष्यें, महाभाष्यें, बंध, प्रमेये वगैरे अनेक गद्य ग्रंथांच्या पोथ्या पाहून सूत्र-पाठाची शक्यतों शुद्ध अशी प्रत तयार केली. 'शुद्ध पाठ' निश्चित करतांना सातआठ जुन्या पोथ्यांवरून त्यांतल्या त्यांत जुना असा पाठ स्वीकारला आणि १९३५ साली सूत्रपाठाची अेक आवृत्ति प्रसिद्ध केली. आधुनिक संशोधकपद्धतींचें पूर्णतः अवलंबन करणें त्या वेळीं शक्य झालें नसल्याने तशा प्रकारची अेक विस्तृत आवृत्ति प्रसिद्ध करण्याचा त्यांचा मानस

होता. आणि १९४२ सालीं त्यांनी तो पुरा केला आहे. प्रस्तुतच्या या सूत्रपाठाच्या तिसऱ्या आवृत्तीचें वैशिष्ट्य म्हणजे त्याला जोडलेला १०० पानांचा विस्तृत अुपोद्घात. या उपोद्घातांत त्यांनी पंथाची गुरुपरंपरा, पंथासंबंधींचे कांही महत्त्वाचे प्रश्न, महानुभावीय तत्त्वज्ञान व आस्तिकवादी भारतीय तत्त्वज्ञानाशीं त्याची सुसंगति अित्यादि प्रश्नांची चर्चा करून सूत्रपाठांतील प्राचीन मराठीचें स्वरूप व व्याकरण यांबद्दलचीहि सोदाहरण माहिती दिली आहे. ग्रंथाच्या शेवटीं दिलेल्या टीपांत शब्दार्थांबरोबर सूत्राचा पूर्वापार संबंधहि दिला आहे. या कामीं श्री. नेने यांना आचारभाष्य, विचारभाष्य, स्थळपोथी, प्रकरणवंश, वचनसंबंध अित्यादि हस्तलिखित पोथ्यांचा अुपयोग करावा लागला आहे.

प्रस्तुत ग्रंथाची विभागणी संपादकांनी तीन विभागांत केलेली आहे. १. अुपोद्घात, २. सूत्रपाठाची संहिता आणि ३. टीपा. पैकी सूत्रपाठाची संहिता हा भाग संपादकीय संशोधनाचा मुख्य गाभा होय. ही मूळ संहिता शोधून पाठ निश्चित करण्यांत संपादकांच्या अडचणी कांही थोड्या नव्हत्या. लिखित ग्रंथाची देखील अस्सल प्रत सहसा सांपडत नाही आणि म्हणून अस्सलाच्या शक्यतों नजीक जाण्यावरच संतुष्ट व्हावें लागतें तर मग अुक्त स्वरूपांत निर्माण झालेल्यां सूत्रांचा तर प्रश्नच निराळा. अन्वयावृत्ति, विद्यामार्ग, निर्वचन अित्यादि प्रकरणें चक्रधर आपल्या शिष्यांकडून घोकून घेत असत. पुढे श्रीमुखींचे शब्द कोणते याविषयी वादहि झाला होता आणि मग त्या त्या संबंधांत आलेल्या व्यक्तींना विचारून सूत्रांचा पाठ तयार झाला. हें प्रथम संकलन वर अुल्लेखिल्याप्रमाणे नागदेवाचार्यांच्या समक्ष केशीराजव्यासांनी केलें. त्यानंतर कांही सूत्रें रामेश्वरव्यास व परशुरामव्यास यांनी संकलित केलीं. ग्रंथाचें स्वरूप सूत्रबद्ध असलें तरी तीं सूत्रें निरनिराळ्या स्थळीं आणि निरनिराळ्या शिष्यांना अुपदेशिलेलीं. तेव्हा अशा रीतीनें निर्माण झालेल्या सूत्रपाठाच्या निरनिराळ्या पोथ्यांवरून पाठचिकित्सा करणें आणि पाठनिश्चिति करणें हें काम साधेंसुधें नव्हे. त्यांत पुनः या सूत्रपाठावरील भाष्यें, बंध, प्रमेयें अित्यादि ग्रंथ तरी संपादित आणि मुद्रित स्वरूपांत असावेत ? तर तेहि नाहींत; आणि या सर्वांत मुख्य अडचण म्हणजे या हस्तलिखित पोथ्यांतील सांकेतिक लिपी. श्री. नेने यांनी या सर्व अडचणी ओलांडून आणि तत्कालीन प्राचीन मराठीचा तौलनिक अभ्यास करून सूत्रपाठाची शुद्ध प्रत तयार केली आहे. मात्र संपादकांनी पाठनिश्चितीसाठी विचारांत घेतलेल्या सर्व पोथ्यांचे अितिहास, त्यांचे वंशवृक्ष अित्यादींची माहिती जर प्रस्तावनेंत दिली असती आणि मूळ संहितेबरोबर तळटीपांतून पाठभेदहि नोंदले असते तर प्रस्तुत सूत्रपाठाचें संपादन आधुनिक संशोधक पद्धतीचें पूर्णतः अवलंबन करून झालें असतें. या गोष्टीची जाणीव संपादकांना असल्याचें त्यांच्या प्रस्तावनेंतील अुद्गारांवरून दिसतें. परंतु अेकंदरींत सर्व पोथ्यांत जो पाठ जुना असेल तोच ग्रहण केलेला असल्याने सूत्रपाठाची बऱ्याच अंशीं शुद्ध अशी संहिता प्रसिद्ध होत आहे असें मानण्यास कांही हरकत नाही.

चक्रधरांच्या सूत्रपाठाची संहिता संशोधून प्रसिद्ध करण्याची जितकी आवश्यकता होती तितकीच त्यांतील तत्त्वज्ञानाची आणि त्यांतून दिग्दर्शित झालेल्या अेकंदर महानुभावीय पंथासंबंधींची चिकित्सापूर्ण माहिती देण्याचीहि आवश्यकता होती. याच दृष्टीने प्रस्तुत ग्रंथाचा शंभर पानांचा अुपोद्घात सजला आहे. हा अुपोद्घात म्हणजे श्री. नेने यांच्या तर्कशुद्ध अनुमानपद्धतीची आणि तौलनिक व्यासंगाची साक्ष म्हणून सांगतां येअील.

अुपोद्घातांत प्रथमतः सूत्रपाठाचें महत्त्व सांगून 'महानुभाव' असें नांव पंथाला असल्याचा आधार सूत्रपाठांत नाही हें सिद्ध केलें आहे. त्यानंतर श्रीदत्तात्रेय व श्रीकृष्ण या दोन

दैवतांची अुपासना असलेल्या या पंथाची गुरुपरंपरा सांगितली आहे. सूत्रपाठांत परंपरेच्या ग्रंथांतील कल्पनांचें प्रतिबिंब कसें अुमटलें आहे याची कल्पना सोदाहरण दिली आहे. प्रस्तुत साम्य दाखविण्यांत संपादकांच्या तौलनिक व्यासंगाची कल्पना वाचकांना येअूं शकते. चातुर्वर्ण्य, विटाळचंडाळ, वोटे-गोटे, मूर्तिपूजा, स्त्रियांचे आचारविचार, स्त्रियांचा संन्यास, महात्मावेष अित्यादींच्या बाबतींत महानुभावीय पंथासंबंधाने बरेच गैरसमज पंथेतरांत पसरलेले आढळतात. सूत्रपाठांच्या आधारें श्री. नेने यांनी या सर्व गोष्टींवर चांगला प्रकाश पाडला आहे आणि अज्ञानामुळे झालेले गैरसमज दूर केले आहेत. पंथाच्या दृष्टीने श्री. नेने यांची ही कामगिरी फारच मोलाची ठरणारी आहे. वोटे-गोटे आणि मूर्तिपूजा या संबंधांत तर महानुभावीयांवर पाताळयंत्रीपणाचा आरोप केला गेला आहे. महानुभाव मूर्तिपूजक नव्हते आणि म्हणून ते मूर्तिभंजक मुसलमानांना जवळचे वाटले असावे असा तर्क करून मुसलमान बादशहाकडून आज्ञापत्राचें फर्मान त्यांनी मिळविलें अशा तऱ्हेचें अनुमान काढलें गेलें होतें. अर्थात् महानुभावीय वाङ्मयाचें संशोधन त्या वेळीं फारसें झालें नव्हतें ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे.

श्री. नेने यांनी या संबंधांत निरनिराळ्या अनेक पोथ्या पडताळून, पंथीयांत मिसळून आणि महानुभावीय वाङ्मयाचें शक्यतों सूक्ष्म अवलोकन करून वरील प्रकारचे आरोप साधार खोडून काढले आहेत. यानंतर चक्रधरांच्या तत्त्वज्ञानाचें सूत्रपाठाच्या आधारें विवेचन करून संपादक त्यांतील भाषेकडे वळले आहेत. प्रस्तुत सूत्रें हीं चक्रधरांच्या वाणींतून निघालीं असल्यामुळे सूत्रांतील मराठी भाषा ही यादवकालीन मराठी भाषा ठरते. सूत्रांचा भाषिक अभ्यास करावयाचा असल्यास प्रथम संहिताशुद्धि होणें अवश्य असतें. परंतु त्यासाठी प्रथम अनेक जुनीं हस्तलिखितें, नकलाकारांच्या पात्रापात्रतेची माहिती, नकलांचा लेखनकाल अित्यादि अनेक गोष्टींची माहिती मिळणें आवश्यक असतें. त्यांत हे सूत्रपाठ मराठी संतांच्या अभंगांप्रमाणे महानुभावांच्या नित्यपाठांतील आहेत. त्यामुळे मराठी संतांच्या अभंगांची संहिता शोधण्यांत जशा अडचणी अुभ्या राहतात तशाच प्रकारच्या अडचणी प्रस्तुत सूत्रपाठाबाबतहि आड येतात. परंतु आहे त्या परिस्थितींत संपादकांना जे कांहीं भाषिक विशेष आढळले ते त्यांनी नमूद केलेले आहेत. केवळ अैतिहासिक आणि तौलनिक अशी भाषिक पाहणी करणें हा संपादकाचा प्रमुख हेतु नाही ही गोष्ट विचारांत घेतली पाहिजे. तरीहि जातां जातां प्रचलित मराठीच्या दृष्टीने त्यांनी स्थूल दिग्दर्शन केलें आहे. प्रथम तत्सम, तद्भव व देशी असे कांहीं शब्द, जोड शब्द आणि वाक्प्रचार देअून मग तत्कालीन प्रत्ययविशेष दाखविणारीं रूपें दिलेलीं आहेत. विभक्तींचे प्रत्यय स्पष्ट कळण्याकरता ते प्रत्यय जाड ठशांत छापलेले आहेत. परंतु मुद्रणदोषामुळे कांहीं शब्दांतील प्रत्ययाअैवजी सगळाच शब्द जाड ठशांत छापला गेल्यामुळे (अुदा० गाउनि, गीति पृ. ९१ अुपोद्घात) वाचकांचा कदाचित् गैरसमज होण्याचा संभव आहे. त्याअैवजी प्रत्यय सुटे देअून मग अुदाहरणादाखल रूपें दिलीं असतीं तर बरें झालें असतें. अर्थात् भाषिक अभ्यास हा प्रस्तुत ग्रंथाचा प्रमुख अुद्देश नव्हे. जातां जातां सूत्रपाठांत आढळलेले भाषाविशेष नमूद करून ते यादवकालीन मराठीशीं कसे जुळते आहेत अितकेंच स्थूलमानाने संपादकांना दाखवावयाचें आहे आणि हे स्थूलमानाने दिलेले भाषाविशेष भाषेच्या अभ्यासकांना निश्चित अुपयोगी पडतील असेच आहेत.

म. सा. प. (१६-२-६)

श्री. नेने यांच्या अुपोद्घातांचें महत्त्व चक्रधरांच्या सूत्रांचा अर्थ आनेराजव्यासकृत लक्षणरत्नाकर या ग्रंथांतील साहित्यदृष्टीने लावण्यांत आणि त्या अनुरोधाने आरंभींच्या संशोधकांचे झालेले गैरसमज दूर करण्यांत मुख्यतः आहे. महानुभावीयांचा काळा वेष वगैरे कांही गोष्टींसंबंधाने ज्या कांही शंका अजून शिल्लक आहेत त्यांचेंहि निरसन श्री. नेने हे पुढील महानुभावीय ग्रंथांत करतील याची प्रस्तुत ग्रंथावरून खात्री वाटते. पंथाचें प्रारंभींचें नांव, गुरुपरंपरा, पंथासंबंधींचे निराधार गैरसमज, त्यांचें आस्तिकवादी तत्त्वज्ञान आणि सूत्रपाठांतील मराठीचे व्याकरणविशेष अित्यादि महत्त्वाच्या प्रश्नांची चिकित्सा प्रस्तुत अुपोद्घातांत केली आहे. ही सर्व चिकित्सा करतांना ठिकठिकाणीं संपादकांनी भारतीय तत्त्वज्ञानांतील तुलनात्मक कल्पना आणि समांतर वचनेंहि दिलेलीं आहेत.

ग्रंथाचा अखेरचा भाग म्हणजे टीपा. या टीपांत देखील केवळ शब्दार्थ न देतां सूत्रांचा पूर्वापरसंबंध दिला आहे. या कामीं संपादकांनी अनेक हस्तलिखित प्राचीन पोथ्यांचा बराच अुपयोग केल्याचें ठिकठिकाणीं दिसतें.

महानुभावीय वाङ्मयाची निर्मिति ही सूत्रपाठावर अधिष्ठित असल्यामुळे मूळ सूत्र-पाठाची चिकित्सापूर्व संपादणी होणें अत्यंत आवश्यक होतें. श्री. नेने यांच्या सूत्रपाठाच्या प्रस्तुत आवृत्तीने ही आवश्यकता बऱ्याच अंशीं भरून आलेली आहे; आणि तीमुळे पंथीयां-अितकाच मराठीच्या अभ्यासकांनाहि फायदा झाला आहे.

मुंबअी व नागपूर येथील विद्यापीठांनी आपल्या पदवी परीक्षेस नागेशकृत 'सीतास्वयंवर' नेमल्यामुळे ज्या दोन प्रती अलीकडे प्रसिद्ध झाल्या त्यांपैकी दुसरी म्हणजे ही प्रस्तुत प्रत होय. याच्या आधीची प्रो. पंगू यांनी १९३७ सालीं प्रसिद्ध केली. प्रो. पंगूंची आवृत्ति 'अनेक अशुद्ध पाठांनी डागळलेली आहे' याकरिता ही नवीन आवृत्ति आपण काढली असें संपादकांचें म्हणणें आहे. या नवीन आवृत्तीस संपादकांनी 'पाठसंशोधित' आवृत्ति असें म्हटलें आहे.

नवीन आवृत्तीच्या प्रस्तावनेंत संपादकांनी मुख्यतः पुढील मुद्यांचा विचार केला आहे. पाठशुद्धता, अर्थलापनिका, वृत्तचिकित्सा आणि सीतास्वयंवरविवेचन व नागेशाची योग्यता. पाठशुद्धतेविषयीं प्रो. पंगू यांस भावे यांनी काढलेली शके १८२५ चीच आवृत्ति अुपलब्ध असल्याने व भावे यांनीच सुधारून काढलेल्या १८२६ च्या आवृत्तींत असलेले शोध अुपलब्ध न झाल्याने पंगूंच्या प्रतीमधले पाठ बरेच अशुद्ध राहिले आहेत हा विवेचनाचा रोख आहे. बरेच पाठ अशुद्ध राहिल्याने अर्थलापनिकाहि पंगूंच्या प्रतींत नीट झाली नाही हा त्यापुढचा विचार आहे. मूळामध्ये घडलेल्या कांही दोषांमुळे वृत्तचिकित्सेच्या बाबतींत प्रो. पंगूंकडून अनेक गल्ती झाल्या आहेत हें संपादकांनी पुढे दाखविलें आहे. पुढे आलेलें विवेचन संपादन-विषयक विचारापेक्षा काव्यविषयक विचारांनी भरलें आहे.

संपादनाच्या बाबतींत प्रस्तुत प्रत प्रो. पंगूंच्या प्रतीच्या बरीच पुढे गेली आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. हें असें होणें स्वभाविकच आहे. प्रो. पंगूंच्या पुढे आधीची अशुद्ध प्रत होती, डॉ. देशमुखांच्या पुढे तीबरोबर (?) भावे यांनी सुधारून प्रसिद्ध केलेलीहि प्रत होती. प्रस्तुत प्रतींत वर मूळ काव्य, त्याखाली पाठभेद, नंतर वृत्तनामें, व त्याहि खालीं अर्थविषयक टीपा अशा पद्धतीने रचना झाल्याने अभ्यासकाच्या दृष्टीने ती फार अुपयुक्त झाली आहे. अशी प्रत काढल्याबद्दल डॉ. देशमुख अभिनंदनास पात्र आहेत.

डॉ. देशमुखांच्या विवेचनांत कांही मुद्दे चिन्त्य वाटतात त्यांविषयी येथे थोडी चर्चा करणें आवश्यक वाटतें. प्रस्तुत प्रत पाठसंशोधित आहे असें ते म्हणतात. हें पाठसंशोधन अप्रसिद्ध हस्तलिखितांवरून झालेलें नाही हें लक्षांत घेतलें पाहिजे. बहुतेक सारा भर मावे यांच्या १८२६ च्या संशोधित प्रतीवर, अर्थात् छापलेल्या. कांही पाठ मावे यांनी न स्वीकारलेले पण टीपांत दिलेले स्वीकारले आहेत. प्रो. पंगु यांची प्रत तिसरी, पण तिचा अुपयोग पाठ टाळण्याकरिताच अधिक झालेला दिसतो. चवथें साधन नागेशकृत चंद्रवळीवर्णनाची काव्यसंग्रहांत छापलेली प्रत. या काव्यांतील सुमारें ८० श्लोक सीतास्वयंवरांत आलेले आहेत. म्हणजे यांतील सारें संपादन केवळ छापील सामग्रीवर आधारलेलें आहे. नव्या संपादनाची अुभारणी केवळ प्रसिद्ध झालेल्या संपादनावरच करणें म्हणजे अर्ध्यावरच थांबणें होय. त्यांतून माव्यांना अुपलब्ध असलेलीं हस्तलिखितेंहि डॉ. देशमुखांस अुपलब्ध नव्हतीं असें दिसतें. नाहीतर (म) प्रतींतील पाठांसंबंधी 'मुद्रणदोष असावा किंवा दिसतो' अशीं मोघम विधानें त्यांना करावीं लागलीं नसतीं. प्रो पंगूंना १८२६ ची प्रत ज्ञातहि नव्हती असा दोष देणारांनी स्वतः केवळ त्याच प्रतीवर समाधान न मानतां कांही, निदान मूळचीं, हस्तलिखितें पाहणें अिष्ट होतें असें वाटतें. तीं हस्तलिखितें आता अुपलब्ध झालीं नाहीत असें असेल तर निर्देश करण्यास प्रत्यवाय नव्हता.

दुसरी गोष्टः— मावे यांनी आपल्या शुद्ध प्रतींत ह्या काव्याचें संपादन निरनिराळ्या प्रतींतील योग्य वाटतील ते पाठ अेकत्रित करून (Variorum पद्धतीनें) केलेलें आहे व आपणहि त्याच पद्धतीने नवीन आवृत्ति संपादिली आहे असें डॉ. देशमुख लिहितात. Variorum प्रत याचा अर्थ सर्व **पाठभेद** देणारी असा नाही. सर्व टीकाकारांची **टीका** अेकत्रित करणारी प्रत असा आहे. पंगू प्रतींतील मतभेदाच्या टीपांखेरीज इतर कोणाच्या म्हणजे मावे यांच्या टीपांचाहि उल्लेख संपादकांनी केलेला दिसत नाही. त्यांच्या टीपा घेतल्या असल्या तर त्यांचा निर्देश Variorum प्रतींत व्हावयास हवा. बहुधा Variorum चा अर्थ निरनिराळे **पाठभेद** देणारी अेवढाच संपादकांना अभिप्रेत असावा. मावे यांनी या अर्थाने Variorum प्रत तयार केली असें त्यांचें मत दिसतें (प्र. पृ. १५). पण मावे यांनी प्रत कशी तयार केली याचा खुलासा माव्यांनीच श. १८२६ च्या संपादनांत दिला आहे. त्यांना वि. का. राजवाडे यांच्याकडून अेक प्रत मिळाली, दुसरी ना. चिं. केळकर यांच्याकडून मिळाली. "दोहोंपैकी पहिल्या प्रतीवरून आम्हीं हें काव्य छापण्यास प्रारंभ केला, व त्याचीं आठ पृष्ठें छापून झाल्यानंतर आम्हांस दुसरी म्हणजे रा. केळकरांची प्रत मिळाली; तेव्हां पुढे या आठ पृष्ठांत मूळ मजकूर पहिल्या प्रतीवरून छापून दुसऱ्या प्रतीचे पाठभेद खाली टीपांत दिले. पुढील सर्व पृष्ठांतील मजकूर या दुसऱ्या प्रतीवरून पहिल्या प्रतीच्या आधारें प्रतिशुद्ध करून छापला. यांत देण्यासारखे पाठभेद नसल्यामुळे पुढे ते दिले नाहींत." आधी हस्तलिखितें दोनच, त्यांतहि पाठभेद दिले आहेत ते केवळ आठ पानांपुरते, तेव्हा या प्रतीस संपादकांच्या अर्थानेहि Variorum कसें म्हणावयाचें ? स्वतः संपादकांना मावे यांचीच श. १८२५ ची प्रत मिळाली नाही असें दिसतें. त्या प्रतीची प्रतिनिधि म्हणून त्यांनी पंगू प्रतच स्वीकारलेली दिसते. १८२५ ची प्रतहि त्यांनी स्वतंत्रपणें आधारास घ्यावयास हरकत नव्हती.

तिसरी गोष्टः—सीतास्वयंवराची आवृत्ति तयार करतांना आपण चार परंपरांचा अुपयोग केला असें संपादक म्हणतात. त्या चार परंपरा कशा होतात तें समजत नाही. परंपरा म्हणण्याअितपत त्यांना स्वतंत्र व्यक्तित्व आहे काय ? पंगूंची प्रत माव्यांच्या परंपरेंतली म्हणावयास हवी.

मान्यांच्याच दोन परंपरा करावयाच्या तर अेक १८२५ ची प्रत व दुसरीं १८२६ ची असें करतां येअील. पण यांतहि परंपरा वेगवेगळी म्हणण्यासारखें कांही आहे काय हें स्पष्ट झालें पाहिजे. १८२६ च्या प्रतीमधील टीपांत आढळलेले पाठहि निराळी परंपरा होअूं शकतात काय? त्याचप्रमाणे सीतास्वयंवरांत चंद्रावळी काव्यांतले ८० श्लोक आले अेवढ्यावर ते श्लोक सीतास्वयंवराची निराळी परंपरा ठरतील काय? यासंबंधी मतभेद होअील असें वाटतें.

१८२६ च्या भावे प्रतींत नागेशाला अभिप्रेत असलेले पाठ संपादकांना दिसले, अितरहि आपण स्वीकारलेले पाठ नागेशाला अभिप्रेत आहेत असें समजून ते डॉ. देशमुखांनी स्वीकारले आहेत. परंतु नागेशाला अमुक पाठ अभिप्रेत आहेत हें ओळखण्याचें गमक मात्र ते सांगत नाहीत. भावे यांना अुपलब्ध असलेल्या मूळ हस्तलिखित प्रतींचा नागेशाशीं प्रत्यक्ष कांही संबंध लागल्याखेरीज अमुक अेक प्रत किंवा तीमधील पाठ नागेशास अभिप्रेत आहेत हें ठरविण्यास अितर कांही साधनें दाखवावयास हवींत.

वृत्तविषयक चिकित्सेंत डॉ. देशमुख यांनी पंगूंच्या प्रतीमधील बरेच दोष दाखविले आहेत, तें योग्यच झालें; परंतु त्यांच्या या चिकित्सक दृष्टीमधूनहि कांही गलती झाल्या आहेत. श्लोक १४४ त्यांनी दिल्याप्रमाणे चंपकमाला नसून शशिवदना अूर्फ मकरकशीर्षा आहे. त्याच पानावर श्लोक १४३ किंवा १४५ यांतून त्या त्या वृत्तांचीं नांवें कवीने ग्रथित केल्याचें संपादकांनी दाखविलें आहे. पण मधल्या १४४ व्या श्लोकांतहि तसेंच झालें आहे व शशिवदना हें नांव ग्रथित झालें आहे हें त्यांच्या लक्षांत आलेलें दिसत नाही. श्लोक ३६६ ते ३७० यांस पंगूंनी मकरकशीर्षा हें अेकच नांव दिलें आहे. तसेंच डॉ. देशमुखांनीहि दिलें आहे. त्याहि बाबतींत श्लोक ३६६ व ३६७ मकरकशीर्षा नव्हेत, ते कुसुमविचित्रेचे आहेत हेंहि कवीने सुचविलें आहे. कुसुमविचित्रा हें वृत्त मकरकशीर्षा किंवा शशिवदना या वृत्ताच्या दुप्पट असतें. बाकी रचना सारखीच, म्हणून हा घोटाळा झाला. पण पुढील तीन श्लोकांत तेंहि कारण सांगतां येणार नाही. कुसुमविचित्रेंत १२ अक्षरी चरण आहे तर श्लोक ३६८ हा १४ अक्षरी चरणांचा आहे. त्यास प्रहरणकलिका म्हणतात. पुढील दोन श्लोकांतहि हा मकरकशीर्षेचा घोटाळा होण्याचा संभव नव्हता. कारण ते १० अक्षरी चरणांचे चंपकमालेस जवळ येणारे असे आहेत, मात्र चंपकमालाहि नव्हेत. याविषयी विस्तृत विवेचन लोकशिक्षण १९३८ जाने. अंकांत आलें आहे.

काव्यविषयक विवेचनांत महाकाव्यें म्हणजे आख्यानकाव्यें व महाकवि म्हणजे आख्यानकवि हीं जीं समीकरणें संपादकांनी मांडलीं आहेत तीं चिन्त्य वाटतात. आख्यानें महाकाव्यपद्धतीने लिहिलीं कीं महाकाव्यें झालीं असें म्हणणें योग्य होणार नाही. दमयंती-स्वयंवराख्यान महाकाव्याप्रमाणे आलंकारिक पद्धतीने लिहिल्याबरोबर तें महाकाव्य झालें, व तें तसें झालें म्हणून त्याचा कवीहि महाकवि झाला ही विचारसरणी मान्य होण्याजोगी वाटत नाही (द. स्व. प्रियोळकर प्रत पृ. ३६). नागेशाला या पद्धतीने महाकवि बनविण्यापेक्षा तो लघुकवि आहे हें मान्य करणेंच अिष्ट. नागेशाच्या कवित्वासंबंधी डॉ.देशमुख यांनी पुढील अुद्गार काढले आहेत–'त्याची स्वतंत्र प्रज्ञा कांहीच व्यक्त झालेली नाही, स्वतःच्या कल्पना फार थोड्या दिसतात, कवीची अभिरुचि अश्लाघ्य आहे, अश्लीलप्रियता अुचंबळलीं आहे, बीभत्स रसाची गटारगंगा वाहविली आहे, तो पारंपरिक वृत्तीचा अेक बेगडी चितारी होता, कृत्रिमता व बेगडी काव्यभक्तीच बुजबुजली आहे, भाषेचा गोडवा किंवा अुच रसिकता नाही, रघुनाथ पंडिताची अभि-

जात रसिकता नाही, सदभिरुचीचें दिवाळें वाजलें आहे.' अि०. अितकें असूनहि देशमुखांनी त्याला वरच्या दर्जाचा कवि (प्र. पृ. ३०) म्हणण्यास प्रवृत्त व्हावें याचें आश्चर्य वाटतें. केवळ अेक संस्कृत महाकाव्यांची अलंकारप्रचुर वर्णनपद्धति स्वीकारल्यामुळे शिशुपालवधकर्ता भास्कर, दमयंतीस्वयंवरलेखक रघुनाथ पंडित, आणि सीतास्वयंवरकर्ता नागेश यांची नांवें संपादकांनी अेकत्र गुंफावींत यांत पाणिनीने केलेल्या श्वानं युवानं मघवानम् पैकीच प्रकार झाला असें म्हणावें लागतें. मात्र येथे क्रम अुलट आहे अेवढेंच. महाकाव्याच्या धर्तीची रचना करणारा म्हणून नागेशाला महाकवींच्या वर्गांत संपादकांनी घातल्यामुळे 'घटानां निर्मातुः त्रिभुवनविधातुश्च कलहः' असा प्रसंग आला असें वाटतें.

डॉ. देशमुख यांनी ही सीतास्वयंवराची दुसरी (कीं तिसरी ?—भावे यांनीहि आपल्या परीने पाठसंशोधन केलें होतेंच, व प्रस्तुत संपादकांनी सर्वांत अधिक ऋण त्या आवृत्तीचेंच घेतलें आहे) पाठसंशोधित आवृत्ति काढल्याने मराठीमधील या पाठसंशोधनाच्या कार्यांत जी भर पडली तिजबद्दल वरील मतभेद दर्शवूनहि अभिनंदन करणेंच योग्य होय. हीं कामें फार परिश्रमाचीं, चिकाटीचीं, कंटाळवाणीं पण महत्त्वाचीं असतात. सूक्ष्म चिकित्सक वृत्ति यांत लागते. म्हणूनच या कृतींचें स्वागत करावयाचें असतें. देशमुखांच्याकडून आणखीहि अशाच प्रकारच्या कार्यांच्या अपेक्षा अभ्यासक करतील यांत शंका नाही.

गं. त्र्यं. ग्रा.

## साहित्य समीक्षा

**आस्वाद**— लेखक प्रो. द. सी. पंगु; प्रकाशक द. ना. मोघे, स्कूल अॅन्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; मूल्य २॥ रु.

कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमधील मराठीचे प्राध्यापक पंगु यांच्या दहा टीकालेखांचा हा संग्रह आहे. कॉलेजांतील मराठीच्या अभ्यासक्रमांत असलेलींच पुस्तकें लेखकाने निवडलीं आहेत. यांत चार काव्यग्रंथ, दोन कादंबऱ्या, दोन नाटकें व अितर दोन लेख अशी वांटणी झाली आहे. यामुळे विवेचनांत विविधता दिसून येते. आस्वाद 'घेण्यापूर्वी' म्हणून लेखकाने जें सांगितलें आहे तें मननीय आहे. कंपूशाहीचा प्रभाव आणि अभ्यासकांचा अभाव यांमुळे चांगलें टीकावाङ्मय निर्माण होत नाही असें सांगून आपण मुख्यतः सहानुभूतीच्या व निःपक्षपातीपणाच्या अुदात्त भूमिकेवरून गुणदोषविवेचन करणार आहोंत अशी स्वतःबद्दल ग्वाही दिली आहे. 'आस्वाद' हें ग्रंथनाम वाचून लेखकाची वृत्ति परीक्षणीय वाङ्मयाने सुप्रसन्न झाली असावी अशी समजूत होते, पण प्रत्यक्ष ग्रंथांत लेखक बऱ्याच ठिकाणीं नाकें मुरडीत आहे असेंच दिसतें.

'आस्वादां'त रागिणी आणि रेंदाळकर यांच्यावर बरेंच विस्तृत परीक्षण आलें आहे व त्यांच्या खालोखाल आंबराअी व जादूगार या दोन पुस्तकांचा परामर्श घेण्यांत आला आहे. त्यांत प्रा. पंगु रागिणीवर जेवढे घसरले आहेत तेवढीच रेंदाळकरांची वकिलीहि त्यांनी केली आहे. रेंदाळकर हे लोकप्रियतेच्या दृष्टीने बरेच अभागी ठरलेले कवि आहेत. केशवसुतांचा संप्रदाय वाढविण्याचा त्यांनीं मनोभावें यत्न केला. गडकऱ्यांना या बाबतींत अवास्तव महत्त्व दिलें जातें तें न देतां केशवसुती संप्रदायाचा 'वारसहक्क' रेंदाळकरांना पोंचवावा असें प्रा. पंगूंचें म्हणणें आहे. रेंदाळकरांच्याविषयीं त्यांनी दाखविलेली सहानुभूति प्रशंसनीय आहे. पण

गडकरी-रेंदाळकर यांच्यामधील तुलनेपेक्षा आजच्या पिढीस रेंदाळकरांच्या काव्यामधील गुणांची खात्री पटविणें ही गोष्ट अधिक निकडीची आहे. प्रा. पंगूंच्या मताप्रमाणे रागिणी जेवढी स्मृतिशेष किंवा त्यांचाच कांहीसा चमत्कारिक शब्द योजावयाचा झाल्यास 'नाममात्र' झाली आहे, तेवढीच स्मृतिशेष रेंदाळकरांची कविता आजच्या पिढीस झाली आहे. रेंदाळकरांच्या कवितेच्या बाबतींत ती त्यांच्या काळीं सुद्धां विशेष लोकप्रिय झाली होती असें नाही. तेव्हा रागिणीच्या बाबतींत तिच्या तत्कालीन लोकप्रियतेची मीमांसा फारशी न करतां तिच्या आजच्या स्मृतिशेषत्वाची मात्र भरपूर चर्चा पंगु यांनी केली आहे; आणि रेंदाळकरांच्या कवितेच्या आजच्या स्मृतिशेषत्वाची किंवा लोकप्रियतेच्या अभावाची चर्चा न करतां केशवसुतांच्या वारसाहक्काची फिर्याद लढवलेली दिसते. ही गोष्ट प्रा. पंगूंनी ज्या निःपक्षपातीपणाची ग्वाही दिली आहे त्याला धरून झालीशी वाटत नाही. रागिणीच्या चर्चेत 'सहानुभूती'च्या खुणाहि दिसत नाहीत. जी वृत्ति रागिणीबाबत त्यांनी स्वीकारली आहे तीच गिरीशांच्या आंबराओ-बाबत दाखविली आहे. काव्य या दृष्टीने आंबराओ हिणकस आहे असा निष्कर्ष त्यांनी काढला आहे. कवीच्या पदरांत यशाचें थोडेंसुद्धा माप टाकावें असें त्यांना वाटत नाही. विवेचनाच्या ओघांत 'नूतन पतिपत्नींच्या लाजाळु प्रणया'ची कवीला फारशी ओळख नसल्याचीहि वैयक्तिक माहिती त्यांनी सांगून टाकली आहे. याला उत्तर देणें बिचाऱ्या गिरीशांना फारच अवघड आहे. आहे म्हणावें तर पुरावा काय द्यावा, नाही म्हणावें तर पंगूंनी जिंकलें असें होणार. सारांश, जी 'उदात्त' भूमिका आपण स्वीकारल्याचें प्रा. पंगु सांगतात, ती त्यांनी सर्वस्वीं चालविली असें म्हणतां येईलसें वाटत नाही. कोठे हायकोर्टांत अपील करणाऱ्या वकिलाची (रेंदाळकर-लेख) तर कोठे सरकारी प्रॉसिक्यूटरची (आंबराई लेख) भूमिका त्यांनी घेतलेली दिसते.

काणेकरांच्या 'चांदरात' या काव्यसंग्रहावरील टीकालेख सुटसुटीत व सुंदर आहे. 'काणेकरांची कविता म्हणजे त्यांच्या वृत्तीचा व जीवनाचा आरसाच आहे' हें पंगूंचें म्हणणें कोणीहि मान्य करील. मात्र काणेकरांच्या काव्याला जी प्रमाणाबाहेर लोकप्रियता लाभली तिचें विवेचन या लेखांत आलें नाही. यशोधनावरील लेख परिचयात्मकच वाटतो. यशवंतांच्या कवितेंत कल्पकता नाही हा लेखकाने काढलेला सूर यथार्थ आहे असें वाटत नाही.

नाटकांपैकी भावबंधन हें अक्षरवाङ्मयांत मोडण्याजोगें श्रेष्ठ आहे असें प्रा. पंगूंचें म्हणणें आहे. या नाटकावरील त्यांची टीका चांगली उतरली आहे, मात्र प्रत्येक पात्राची ओळख करून देण्याची आवश्यकता 'उद्यांचा संसार' यावरील लेखाप्रमाणे येथेहि होती असें वाटत नाही. या दुसऱ्या नाटकाच्या सूत्रभूत विषयाचें व कथानकाचें केलेलें आविष्करण यथार्थ आणि मार्मिक आहे. कथानकांतील विसंगतीच्या स्थळांवर व पात्रांच्या स्वभावदर्शनांतील व्यंगावर नेमकें बोट ठेवण्यांत येथे व अन्यत्र लेखकाची मार्मिकताच प्रकट होते. श्री. अत्र्यांची प्रतिभा 'स्वतंत्रपात्रनिर्माणक्षमा' नाही असें पंगूंचें मत दिसतें. या नाटकावरील टीकेंत नाट्यतंत्रविषयक कांही चांगली चर्चा वा विवेचन असतें तर अधिक चांगलें झालें असतें. परांजप्यांची लेखनशैली व ऐतिहासिक कादंबरी हे दोन लेख मात्र इतर टीका-लेखांच्या मानाने सामान्य उतरले आहेत. ऐतिहासिक कादंबरीचें विवेचन मामुली स्वरूपाचें वाटतें. परांजप्यांच्या भाषाशैलीविषयक लेखांत 'मनुष्यस्वभाव तशी भाषाशैली' या सिद्धान्ताकडे दुर्लक्ष करून अमुक प्रमाणांत हें सांपडतें, व अमुक प्रमाणांत तें सांपडतें असा त्यांच्या

भाषाशैलीवर अितरांचा झालेला परिणाम शोधण्याचाच प्रयत्न अधिक झाला आहे. लेखारंभीं परांजपे यांच्या चरित्राचा केलेला विस्तार विद्यार्थ्यांकरिता झालेला दिसतो.

या संग्रहांत आलेल्या सर्वच लेखांची भाषा रसवती व वक्तृत्वपूर्ण आहे. रागिणीवरील लेखांतू ती फारच सुभग रीतीने पदन्यास करतांना दिसून येते. लेखकाच्या भाषाशैलीला रसिक टीकाकाराच्या घरीं ती शोभावी अितकें सौंदर्य खचित लाभलेलें आहे. 'जादूगार'वरील टीकेंत टीकाकाराची बारीकसारीक तपशील न्याहाळण्याची सूक्ष्म दृष्टि प्रकट झाली आहे. फडक्यांच्या भाषेंतील संस्कृतप्रचुरता व तिचें कमावलेलें कृत्रिम स्वरूप पंगूंनी मार्मिकतेने सांगितलें. प्रा. पंगु यांनी अधिकाधिक पुस्तकांचा असाच आस्वाद घेतल्यास व तो आजच्यापेक्षा अधिक समतोलपणें व्यक्त केल्यास मराठी टीकावाङ्मयांत चांगली भर पडेल यांत शंका नाही.

वि. म. कु.

## चरित्र

१ **आबे फारीय**— लेखक शणै गोंयबाब; प्रकाशक के. अेस्. नायक, गोमन्तक प्रेस, गिरगांव, मुंबअी.

२ **भारतीय प्रभावी पुरुष**— लेखक र. दा. मेहता व शा. खे. शाह; प्रकाशक चिटणीस जैन साहित्य प्रकाशन समिति, चांदवड (जि. नाशिक); मूल्य १ रु.

गोव्याच्या कोंकणी भाषेचे सुप्रसिद्ध अभिमानी श्री. वामनबाब वर्दे वालावलीकर (शणै गोंयबाब) यांनी कोंकणी भाषेंत मुद्दाम लिहिलेलें हें आठवें पुस्तक आहे. कोंकणी भाषा ही सारस्वताची म्हणजे लिहिण्याची भाषा व्हावी व तिचें 'बोली'चें स्वरूप जाअून तीं स्वतंत्र भाषाभगिनींच्या पंक्तीला बसावी या स्तुत्य अुद्देशाने श्री. वर्दे अशीं कोंकणी पुस्तकें लिहीत आहेत. प्रस्तुत 'आबे फारीय' या मोहनविद्येच्या आद्य शास्त्रीय संशोधकाचें चरित्र लिहिण्याचा त्यांचा दुसरा अेक हेतु 'आमच्या गोंयकारांनी जरी परक्यो भासो लागीं केल्यो तरी तांणीं परक्यांचें निस्तें अुष्टें खावन सुण्यामाशेन वांचचें न्हंय. तांणीं फारियामाशेन आपल्या खासा मेंदून येवजून, कसलें तरी नवें गिन्यान अुजवाडा हाडचें' असें अुपदेशण्याचा आहे.

आबे फारीय हा मूळ गोव्यांतला ब्राह्मण खिस्ती. त्याचा जन्म बारदेस महालांतील कांदोळें गांवीं झाला. तो बापाबरोबर पुढे पोर्तुगाल व नंतर फ्रान्समध्ये गेला. तेथे त्याने फ्रेड्रिक आंतोन मेस्मेर या जर्मन संशोधकाचा 'चुंबकी व्हाळा'चा (Fluido magnetico) शोध पुढे नेअून स्वतंत्रपणें 'घणघणीत अुजवाडाची न्हीद' (Sommeil lucide) असा नवा शोध लाविला. जागेपणीं अिंद्रियांना जें ज्ञान होत नाही तें निद्रावस्थेंत होतें असें फारीयाने प्रयोग करून सिद्ध करून दिलें. या शोधाचा रोगनिवारणाच्या कामीं फार अुपयोग झाला. Hypnotism किंवा मोहनिद्रा या शास्त्राचा आद्य संशोधक म्हणून आज फारीय गणला जातो पण जिवंतपणीं त्याचा फार छळ करण्यांत आला. जादूटोणा करणारा म्हणून त्याची लोकांनी टर अुडविली. त्याची अन्नान्नदशा झाली. तथापि त्याने न डगमगतां आपला शोध सविस्तर प्रसिद्ध करण्याचा अुद्योग आरंभला. पण अेक खंड बाहेर पडतो न पडतो तोंच आबे फारीय कालवश झाला. मग मात्र त्याच्यावर स्तुतिसुमनांचा वर्षाव होअूं लागला !

त्याने आपल्या पुस्तकावर आपल्या नांवापुढे 'Brahmine' (ब्राह्मण) असें अुपपद

पंडिती पदव्यांच्या पूर्वींच लावलें आहे. यावरून त्याला आपल्या मायदेशाचा व संस्कृतीचा किती अभिमान होता हें दिसून येतें. याच अभिमानाच्या भावनेवर भर देऊन शणै गोंयबाबनी, आज सारस्वत समाजाला ब्राह्मण म्हणविण्याची लाज वाटवे याबद्दल कडक शब्दांत दोष दिला आहे व "आदीं बामण, आनीं मागीर गरज पडली जाल्यारूच 'गोड आनी कोडू सारस्वत !' हें तांणीं ध्यानांत दवरचें." असा अिशारा दिला आहे.

आबे फारीयाचें चरित्र मागे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेंत (वर्ष ६ अं. १) प्रो. पिसुर्लेकर यांनी दिलेलेंच होतें. तथापि कोंकणी भाषेंत त्या भाषेच्या साहित्यांत भर म्हणून प्रथमच पुढे येत आहे. थोड्या सरावाने व महाराष्ट्र शब्दकोशाचा अुपयोग करून पुस्तकाची भाषा समजण्यासारखी आहे. कोंकणी येत नसणाऱ्या साहित्यिकांनी अशा पुस्तकांवरून कोंकणी शिकावी. श्री. वर्दे हे कोंकणी भाषेचे 'टांकसाळे' आहेत. होतांहोअीतों शुद्ध संस्कृत किंवा मराठी शब्द ते टाळतात. 'संशोधक' या अैवजी 'सोदपी'; 'जग' न म्हणतां 'संवसार' (संवसारभर ताची किर्त गाजता), 'पांढरपेशा'बद्दल 'धवेटो'; 'स्पष्टीकरण' किंवा 'फोड' याच्या जागीं 'फोडणिशी' वगैरे. सहज चपखल बसतील असे शब्द ते योजतात त्यामुळे पुस्तक वाचतांना कांही ठिकाणीं आनंद वाटतो. 'फारीया फाटल्यान मुलविद्येच्या शास्त्रांत जे जे कोण वावुले तांणीं फारियाचोच सिद्धांत अुखलून धल्ला आनी ताका त्या शास्त्रांत, सगळयांत वैलो पाट आनीं पैले तिलकेचो मान दिला' (फारियाच्या मागून जे जे कोणी या मोहविद्येच्या शास्त्रांत वावरले त्यांनी फारियाचा सिद्धांत अुचलून धरला आणि त्याला त्या शास्त्रांत सगळयांत वरचा पाट आणि टिळ्याचा पहिला मान दिला). 'वरचा पाट' आणि 'टिळ्याचा पहिला मान' हे वाक्प्रचार किती बाळबोध व जुन्या परंपरेची आठवण करून देणारे आहेत ! असो.

मराठीचा मुद्दाम द्वेष न करतां कोंकणीभाषासंवर्धनाचा असा प्रयत्न अितर कोंकणी साहित्यिकांनी केल्यास मातृभाषेची (आवै भाशेची) मोठीच सेवा होणार आहे.

चांदवडच्या महाराष्ट्र-जैन-साहित्य-प्रकाशन समितीचें 'भारतीय प्रभावी पुरुष' हें पहिलें पुस्तक आहे. समितीचा अुद्देश जैन साहित्य मराठी वाचकांना अुपलब्ध करून देण्याचा जो आहे तो निःसंशय मराठीला अुपकारक आहे. महाराष्ट्रांत जैन धर्माचें पूर्वापार अस्तित्व असूनहि वैदिकधर्मानुयायांना जैनसंस्कृतीची बहुधा माहिती नसते. ही गोष्ट लाजीरवाणी तर खरीच. आपण आपल्यापुरतें पाहतों हा आपणां महाराष्ट्रीयांवरचा आरोप पुसून टाकतां यावयाचा नाही. आपल्या शेजारच्यांची आपणांस कितपत माहिती असते किंवा ती करून घेण्याची बुद्धि तरी असते का हें ज्याचें त्याने मनाशीं विचारून पाहावें. असो. अितर धर्मांतल्याप्रमाणे जैन धर्मांतहि किती तरी प्रभावी पुरुष होअून गेले आहेत. त्यांपैकी तिघांचीं (श्रावक शांतिदास, हीरविजयजी सूरि व तीर्थंकर पार्श्वनाथ) सुंदर चरित्रें प्रस्तुत पुस्तकांत दिलीं आहेत. तिघेहि अैतिहासिक पुरुषश्रेष्ठ असून, पार्श्वनाथ तीर्थंकर तर देवकोटीपर्यंत वर चढले आहेत. यांचीं मंदिरें सर्वत्र आढळतात. अेवढेंच नव्हे तर सर्वच जैन मंदिरांना पारसनाथाचें मंदिर म्हणून जैनेतर लोक ओळखतात. जैन धर्माची आणि तत्त्वज्ञानाची ओळख या चरित्रावरून कांहीशी होणार आहे. चरित्रलेखन सुबोध व मनोरंजक करण्याचा लेखकांचा प्रयत्न चांगला साधला आहे. समितीने अशींच पुस्तकें प्रसिद्ध करून मराठी साहित्यांत नवी भर घालावी अशी चालकांना विनंती आहे.

**चिं. ग. क.**

## कथा

१ **चाकोरीबाहेर व अितर गोष्टी**— लेखक सौ. वसुमती धारकर; प्रकाशक पु. आ. चित्रे, आत्माराम प्रिंटिंग प्रेस, खारीबाव, बडोदें.

२ **मालगाडी**— लेखक श्री. शामराम ओक; प्रकाशक शेठ हिरजी मोहनजी, केशवजी नाओकाची चाळ, कांदेवाडी, मुंबओी ४; मूल्य रु. तीन.

३ **अंतरंग**— लेखक आनंदीबाओी किर्लोस्कर, किर्लोस्कर वाडी; मूल्य रु. पावणेदोन.

४ **संध्यांचा बाग**— लेखक शान्ताराम; प्रकाशक श्री. कृ. ना. सापळे, रामकृष्ण प्रकाशन मंडळ, त्रिभुवनरोड, मुंबओी ४; मूल्य रु. सव्वा.

स्त्रीजीवनाचीं चित्रें कथावाङ्मयांत रेखाटणाऱ्या ज्या कांहीं थोड्या लेखिका महाराष्ट्रांत आहेत त्यांत **चाकोरीबाहेर व अितर गोष्टी** लिहिणाऱ्या सौ. वसुमती धारकर यांचाहि यापुढे समावेश करणें जरूर आहे. स्त्रीजीवनाचीं चित्रें स्त्रियाच यथार्थतेने रंगवूं शकतात. त्यांत सौ. धारकर यांची दृष्टीहि महत्त्वाकांक्षापूर्ण दिसते. परिस्थितीच्या तुडाख्यांत न सांपडतां प्रवाहपतित जीवनापासून धैर्याने बाहेर पडून आपल्या आयुष्याचा मार्ग स्त्रियांनी क्रमिला पाहिजे या मध्यवर्ती कल्पनेंतून 'चाकोरीबाहेर'मधील साऱ्या कथांचें लेखन झालेलें दिसतें. स्त्रियांनाहि आशाआकांक्षा असतात, त्यांना स्वतंत्र अस्तित्व असतें, त्यांच्या व्यक्तिविकासाची आवश्यकता असते आणि या व्यक्तिविकासाच्या आड जर त्यांचा संसार येअूं लागला तर त्याचाहि त्याग करून देशसेवेला त्यांनी धाहून घेतलें पाहिजे असें दर्शविण्याकरिता 'चाकोरी-बाहेर', 'प्रसाद' आणि 'आदर्श' या गोष्टींचा जन्म झालेला आहे. रूढ चाकोरींतून जर स्त्रिया बाहेर पडूं शकल्या नाहींत तर त्यांच्या जन्माचें मातेरें कसें होतें याचें चित्र 'शीला' या कथेंत आढळतें. 'क्षितिजावरील तारा' या कथेंत देखील अेका खऱ्या आणि प्रसिद्धिपराङ्मुख समाजसेविकेचें चित्र रंगविलें आहे. रूढ परंपरागत चाकोरींतून बाहेर पडण्यासाठीं बंडखोरी करण्याची वृत्ति जरी आवश्यक असली तरी बंडाचें निशाण अुभारण्यापूर्वी सामदामादि अुपायांचा अवलंब करण्याचीहि तितकीच आवश्यकता असते. परंतु 'चाकोरीबाहेर'मधील नीला व 'प्रसाद'मधील अचला या आपल्या पतींचें लक्ष आपल्याकडे वेधण्याचा किंवा आपल्या तक्रारी त्यांच्या कानांवर घालण्याच्या भानगडींत न पडतां थेट घराबाहेर पडतात. यामुळे कथांचा शेवट स्वाभाविक होत नाही. 'नीला' या कथेंतील नायक-नायिकांची भेट जरी मोटार-अपघाताने होत असली आणि अेकंदर कथानकाची मांडणी अनुभवाच्या विरुद्ध असली तरी त्यांतील नीला आणि माला यांचीं चित्रें हृद्य आहेत.

प्रस्तुत संग्रहांतील कथा कांहीं अेका विशिष्ट दृष्टीने लिहिल्याकारणाने जरी कांहीं कथांतून अस्वाभाविकतेचा दोष आढळत असला तरी त्यांत आढळणारा आवेश, मार्मिक वर्णन-पद्धति, शुद्ध मराठी वळणाची भाषा अित्यादींमुळे त्या हृदयंगम वाटतात. स्त्रीस्वातंत्र्याच्या तळमळीला तर्कशुद्ध विचाराची जोड मिळाल्यास प्रस्तुत लेखिकेच्या हातून यापेक्षां जास्त परिणामकारक अशा कथा लिहिल्या जातील अशी अुमेद प्रस्तुत संग्रहावरून करण्यास हरकत नाही.

'कोपरखळ्या', 'गलोल', 'बाभळवनांत' अित्यादि संग्रहांचे लेखक श्री. शामराव ओक यांच्या 'विनोदी', 'बिनविनोदी किंवा लेबल नसलेल्या' अशा अेकंदर वीस कथांचा संग्रह

**मालगाडी** या नांवाने प्रसिद्ध झाला आहे. मोहक, गुलगुलीत आणि काव्यगर्भ अशा नांवांची वाचकांच्या तोंडाला बसलेली मिठी अशा अेखाद्या गांवढळ नांवाने जाअील अशी अपेक्षा या नामकरणासंबंधी श्री. ओकांनी धरलेली आहे. संग्रहाला नांव देण्यांत ही जी त्यांची दृष्टि दिसते तीच दृष्टि जगाकडे पाहण्यांत आणि कांही गोष्टींना नांवें ठेवण्यांत दिसून येते. चांगलें चांगलें जें आपण म्हणतों तें नेहमीच चांगलें असतें असें नाही; त्यालाहि दुसरी बाजू असते. परंतु सामान्यतः या दुसऱ्या बाजूकडे डोळेझाक करण्याच्या वृत्तीमुळे माणसांतील माणुसकीला नानाप्रकारांनी कीड लागते. ही कीड दूर करणें हें काम विनोदी लेखकांचें असतें, आणि तेंहि हसत खेळत फारशा वेदना न होतील अशा बेताने. श्री. शामराव ओक हे अशा प्रकारच्या विनोदी कथालेखकांपैकी अेक यशस्वी लेखक आहेत. प्रस्तुत संग्रहांतील कथांतून प्रचलित नीति-अनीतीचीं तत्त्वें, सुशिक्षित पांढरपेशांची संकुचित मनोवृत्ति, तकलुपी कलावंतांचा बाजारभाव आणि त्यांची जाहिरातबाजी, अित्यादि अनेक अनिष्ट गोष्टींचा श्री. शामरावांनी अुपहास केला आहे. 'I laugh because I can not cry, that's all, that's all' हें जें वचन त्यांनी संग्रहाच्या सुरुवातीस अुद्धृत केलें आहे त्यांतून देखील त्यांना हेंच सूचित करायचें आहे की जगांत निर्मळपणें हसण्यासारखें असें कांही दिसत नाही. प्रत्येक गोष्ट डागाळलेली आहे. आणि खरोखरी या साऱ्या गोष्टी पाहून रडूंच कोसळतें. पण रडणें हा कांही आपला धर्म नाहीं; आणि म्हणूनच केवळ यांच्याकडे पाहून हसावें लागतें. श्री. ओकांच्या विनोदांत केवळ विनोदाकरिता म्हणून विनोद असा विदूषकी थाट आढळत नाही याचें कारण हें आहे.

प्रस्तुत वीस कथांपैकी सहा कथा ओ. हेन्री आणि पी. जी. अुडहाअुस या पाश्चात्य लेखकांच्या कथांवरून लिहिल्या आहेत असें श्री. ओकांनी प्रांजळपणें शेवटीं नमूद केलें आहे. हो! चालू जमान्यांत हाहि अेक विशेषच मानला पाहिजे. या कथा जरी पाश्चात्य कथांवर आधारलेल्या असल्या तरी त्या अंतर्बाह्य अेतद्देशीय वाटतात. रूपान्तरकर्त्याचें कसब तर सारें यांतच असतें. विशेषतः पहिलीच कथा 'अुपरतीचा क्षण' ही तर या संग्रहांतील अेक अुत्कृष्ट कथा आहे. गॉर्कीच्या Twenty six and One या गोष्टीवरून 'सव्वीसजणांची सजणी' ही जितकी अुत्कृष्ट कथा त्यांनी लिहिली होती तितकीच ओ. हेन्रीच्या अेका कथेवरून लिहिलेली 'अुपरतीचा क्षण' ही कथा अुत्कृष्ट आहे. आठ महिने चौपाटीवरचा बाक आणि चार महिने जेल असा ज्या गुणाजीचा कार्यक्रम त्यानें 'चलो आता पावसाळा आला, कांहीतरी करून जेलखाना गांठला पाहिजे' म्हणून जंग जंग पछाडलें तरी त्याला पोलिस पकडीत नाही, आणि ज्या वेळीं अेका देवळापुढे भाविक मंडळींचें भजन अैकून त्यालाहि अुपरती होते आणि 'आता यापुढे आपण आपलें आयुष्य सुधारून सन्मार्गाने वागायचें' असा तो ज्या क्षणीं निश्चय करतो, त्याच क्षणीं कांही अेक न करतां पोलिस त्याला हटकतो आणि फरासखान्याकडे खेचतो. पाहा जगाचा न्याय कसा आहे तो. आणि हा न्याय श्री. ओकांनी शेवटच्या कलाटणीच्या योगाने जितका परिणामकारक दाखविला आहे तितकाच अेकंदर वर्णनांतील अुपहासगर्भ विनोद बहारदार वठवला आहे. हॉटेल, वेटर, 'पुलीस' अित्यादींचीं वर्णनेंहि सुरेख आहेत. 'सखू आणि साळू' या कथेतील कल्पना जरी अेका विशिष्ट मनोवृत्तीची निदर्शक असली आणि तीमुळे जरी मध्यमवर्गांतील नवरा आणि खालच्या मोलमजुरी करणाऱ्या वर्गांतील नवरा यांतील विरोध स्पष्ट होत असला तरी शेवटीं सखूच्या तोंडीं घातलेली भाषा अतिरंजित वाटते. 'औलिया आणि अुदमांजर', 'घञ्याळजीची मुलगी', 'ढगे मास्तरांची जबानी' अित्यादि

कथांतून पांढरपेशा मध्यमवर्गाच्या मनोवृत्तीची विनोदगर्भ टवाळी केली आहे. 'शिकार' या कथेंत संस्थानिकांचा कारभार आणि त्यांचें शौर्य वेशीवर टांगलें आहे. 'नाटकाचा बाप' व 'झाडूचा गणपति' या कथांतून नकली आणि तकलुपी कलावंतांचा प्रतिभावंत म्हणवून घेण्याबद्दलचा अट्टाहास आणि त्यांचें प्रसिद्धीचें तंत्र यांच्यावर चुरचुरीत कोरडे ओढले आहेत. 'हे पाहा पंधरा हरामखोर' यांत अन्यांच्या अेका लेखाचें विडंबन आहे. श्री. ओक हे कुणा व्यक्तीवर आपलें विनोदाचें शस्त्र जसें अुचलत नाहीत तसेच ते कुणाहि व्यक्तीचा मुलाहिजा ठेवीत नाहीत. 'बकऱ्यांची घटनापरिषद्' बोलावून त्यांनी तींत शेगांवच्या शेळीलाहि हजर केलें आहे.

कांही कथांतून कांही व्यक्तींचा तोंडवळा जरी भासमान होत असला तरी श्री.ओकांचा रोख व्यक्तीपेक्षा त्या मागच्या वृत्तीवरच दिसतो. मात्र समाजांतील ज्या कांही प्रवृत्ति त्यांना अनिष्ट वाटतात त्यांबद्दल ते नुसते चिडत, रागावत नाहीत. यामुळे त्यांच्या विनोदांत बोचकपणा आणि कडवटपणा न येतां खेळकरपणा आलेला आहे.

श्री. शामरावांच्या 'मालगाडीं'तील मालमसाला हा असा आहे. त्यांतील खमंगाअीमुळे वाङ्मयरसिकांना रुचिपालट लाभेल याबद्दल शंका वाटत नाही.

ग. व. ग्रा.

आनंदीबाअी किर्लोस्करांचा **अंतरंग** हा दुसरा लघुकथासंग्रह त्यांच्या पहिल्या संग्रहाअितकाच, किंबहुना त्याहूनहि कांकणभर अधिकच, सरस असा अुतरला आहे.

या संग्रहाचें अेक वैशिष्ट्य असें की यांतील साऱ्याच लघुकथा अुत्तम या सदरांत येतील अशा आहेत. लघुकथा या वाङ्मयप्रकाराच्या मूल्यांनी त्यांचें मापन केलें तर त्यांच्या गुणांची सरासरी फारच वर लागेल हें निःसंशय. साधारणतः असें दिसतें की कोणत्याहि नामवंत लघुकथालेखकाच्या संग्रहांत अेक दोनच नमुनेदार कथा असतात आणि अुरलेल्या कथांची प्रत अगदी सुमार असते. नमुनेदार कथा आणि त्याच संग्रहांतली अगदी सुमार असलेली कथा यांच्यांत गुणांचें अंतर फार मोठें दिसून येतें. परंतु प्रस्तुत संग्रहांतली अुत्कृष्ट गोष्ट आणि साधारण वाटणारी कथा यांतील गुणांचें अंतर अगदीच अुपेक्षणीय असल्याचें दिसून येतें हें विशेष होय. गुणांची अितकी अुच्च सरासरी प्रकट करणारा अलीकडील कथासंग्रह 'दिव्यावरती अंधेर' याशिवाय दुसरा दिसत नाही.

या संग्रहाचा दुसरा विशेष म्हणजे यांतील पानापानावर स्त्रियांचें अंतरंग प्रकट झालें आहे हा होय. स्त्रीजीवनाचें मर्म स्त्रियांनाच कळणें शक्य आहे हें जरी खरें असलें तरी तें वाङ्मयांतून प्रकट व्हावयाला आजपर्यंतचा काळ जावा लागला हीहि गोष्ट तितकीच खरी. स्त्रीजीवनाबद्दल ज्यांना म्हणून सखोल दृष्टि प्राप्त झाली अशा ज्या बोटांवर मोजण्याअितक्या लेखिका मराठींत सांपडतील त्यांत आनंदीबाअी किर्लोस्करांना फारच वरचें स्थान मिळणें जरूर आहे.

आनंदीबाअींची दृष्टि सुशोभित दिवाणखान्यांतून नव्या कोऱ्या मोटारींत पाय ठेवणाऱ्या सुशिक्षित अशा अुच्च मध्यवर्गाकडेच केवळ लागली नव्हती हें या कथांवरून स्पष्टच दिसतें; त्यांच्या सहानुभूतीचें क्षेत्र त्याहून विस्तृत आहे व त्यांत मध्यमवर्गच नव्हे तर त्याजबरोबर आपापल्या परिस्थितीशीं झगडणारा मध्यमवर्गाचा नोकरवर्गहि येतो हीहि विशेष अभिनंदनाची

गोष्ट आहे. अेकत्र कुटुंबपद्धतींत थोरल्या बंधुराजावर अवलंबून असलेल्या, व्यक्तित्वहीन नवऱ्याशीं संसार करण्याचा प्रसंग आला की सुशीलेसारख्या अश्राप मुलीच्या कपाळीं कोणता दुर्भोग येतो याचें भेदक चित्रण 'सुशिलेचें भवितव्य' या कथेंत केलें आहे. पैशाच्या लोभामुळे व असहायतेचा फायदा घेणाऱ्या समाजकंटकांमुळे वेश्याजीवनाच्या कर्दमांत रुतलेली तारा आपल्या प्रिय गिऱ्हाअिकाच्या पत्नीवर तसलाच प्रसंग ओढवला असतां अंतःकरणाचें केवढें औदार्य प्रकट करूं शकते याचें हृदयंगम चित्रण 'तारा कीं तारिणी' या कथेंत आलें आहे. 'अंबूचें शिक्षण' ही अगदीच अेक निराळी लघुकथा आहे. मोलकरणीची मुलगी चुणचुणीत दिसली, म्हणून तिला शालेय शिक्षण देण्याचा आग्रह धरणाऱ्या मालकिणीला शेवटीं अंबूच्याच अुदाहरणावरून पटतें की अेखाद्या दुसऱ्या व्यक्तीने अेखाद्या दुसऱ्या व्यक्तीला शिक्षण देण्याचा अट्टाहास करून समाजाचें तर राहोच पण व्यक्तीचें देखील हित साधत नाहीं; अुलट अनहितालाच तें कारण होतें. संपत्तीच्या लोभाकरिता लग्नाचा रूढ नीतिमार्ग सोडून चोरट्या व्यभिचाराला प्रवृत्त करणाऱ्या खानदानी दंभाचा स्फोट लेखिकेने 'खानदान' या कथेंत केला आहे. देवकी हें मराठा समाजातील कर्तबगार आणि व्यक्तित्वपूर्ण अशा अेका अशिक्षित स्त्रीचें दुःखान्त स्वभावचित्र आहे

केवळ अंतरंगाचें दर्शन देअून पलीकडे होणाऱ्या निर्विकार कलावंताची वृत्ति प्रस्तुत लेखिकेची आहे असें वाटत नाहीं. स्त्रियांचें अंतरंग हाच केवळ तिच्या कुतूहलाचा विषय नसून तें तसें कां बनलें, तें तसें बनविण्याची जबाबदारी कोणावर, याहि प्रश्नाने तिचें मन भारावलें असल्याचें ठिकठिकाणीं प्रत्ययास येतें. सत्प्रवृत्त तारेला वेश्येचें हीन जीवन कां पत्करावें लागतें? अंबूला शिक्षण देण्याचें पुण्यकृत्य करणाऱ्या मालकीणबाअींना अंबूचें जीवित विस्कटल्याचें कां पाहवें लागतें! अश्राप आणि असहाय सुशीलेला दुसऱ्याच्या पापास्तव गृहत्याग कां करावा लागतो? संस्कृतीचे आधारस्तंभ म्हणून मिरविणाऱ्या खानदानांना छुप्या व्यभिचाराचा मार्ग पत्करणें कां भाग पडतें? हे व असले प्रश्न लेखिकेपुढे अुभे आहेत. आणि ते तसेच आणि तितक्याच तीव्रतेने वाचकांच्या मनांत अुभे करून त्यांचें मन समाजांतील विषमतेच्या दुःसाध्य रोगाकडे वेधणें हेंच या कथांचें वैशिष्ट्य आहे.

लघुकथेचा अेक विशेष प्रकार त्यांनी अगदी आपलासा करून आपल्या वैशिष्ट्याचा ठसा त्यावर ठेवला असल्याचें त्यांच्या दोन्ही संग्रहांतील कथांवरून अुघड दिसतें. साधेपणा, जिव्हाळा, मार्मिकता आणि प्रसाद हीं त्यांच्या निवेदनपद्धतीचीं वैशिष्ट्यें सांगतां येतील.

स्त्रीजीवनाचें मर्म ओळखणारी पण सामाजिक दृष्टि असलेली अेक अुत्कृष्ट कथालेखिका अितक्या लौकर आपणांतून नाहीशी व्हावी ही मराठी वाङ्मयाची मोठीच हानि समजली पाहिजे.

**संत्र्यांचा बाग** या संग्रहांतील लघुकथांवरून लेखक अजून पोरसवदेपणाच्या (adolescence) स्थितींतून बाहेर पडला आहे असें दिसत नाहीं. जीवनाबद्दल अभूतपूर्व आकर्षण वाटत असूनहि पोरसवदा भीतीमुळे त्यापासून दूर राहणें आणि तेथूनच जीवनाबद्दल नानापरीचीं कल्पनारम्य चित्रें रंगविणें ही जी पोरसवदेपणांतली प्रबळ वृत्ति तिची दाट छाया या संग्रहांतील लघुकथांतून स्पष्ट दिसते. प्रेम आणि विकार हीं या मनस्थितींतलीं गाढ आकर्षणें. त्यांबद्दल चित्रविचित्र कल्पना रचीत राहणें हा त्या मनःस्थितीचा धर्म. या संग्रहांतील तीन चार लघुकथा सोडल्या तर बाकीच्या बारा या दोन विषयांवरच लिहिलेल्या दिसतात. त्यांत आलेलीं

स्त्रीपुरुषांचीं पात्रें आणि तीं ज्या घटनांत सांपडलीं आहेत त्या घटना या साधारण जीवनांतल्या नसून कल्पनाशक्तींतच वास करणाऱ्या आहेत. सोंगडी या गोष्टींतली 'नीरा' व 'मी' हीं पतिपत्नी नसूनहि– नव्हे ती दुसऱ्याची पत्नी व हा दुसरीचा पति असूनहि– 'आमचं अेकमेकांवर प्रेम आहे व तरीहि दोघें सुखांत आहोंत' ही स्थिति, किंवा लग्नापूर्वी केवळ प्रसिद्धीकरिता 'समाज-स्वास्थ्यां'त लैंगिक स्वातंत्र्य आचरणांत आणण्याची तरफदारी करणारा लेख लिहिणारी कुमारिका, या आजच्या समाजजीवनांत कोठे बसूं शकतील?

या विषयांचा स्पर्श ज्या तीन चार लघुकथांना झाला नाही त्यांतल्या 'मुत्सद्दी' व 'भेद-रेखा' या मात्र लेखकाच्या भवितव्याबद्दल आशा अुत्पन्न करणाऱ्या आहेत. 'भेदरेखें'त जंगली वातावरण आणि जंगली टोळ्यांचा स्वसंस्कृतिसंरक्षणांत दिसून येणारा कणखरपणा यांचें परिणामकारी मिश्रण साधलें आहे. 'मुत्सद्दी' या कथेंत निवडणुकींतल्या वातावरणावर व व्यक्तींवर अुपरोधपूर्ण पण विनोदी टीका अुत्तम साधली आहे.

ना. मा. सं.

---

## स्त्रियांच्या म्हणी

(६५ व्या अंकावरून पुढे)

(६५८) सून आली घरांत, सासू पडली केरांत.
(६५९) घोडें पाहून खरारा, अन् तोंड पाहून मुशाहिरा.
(६६०) कापलें तरी आपलें.
(६६१) हलवायाच्या पोराला पेढ्याचा नैवेद्य.
(६६२) दिसायला गरती, अन् गांवभर फिरती.
(६६३) अग माझी ऊं, आई नको बाप नको गणगोत तूं.
(६६४) माखून गोड लागेना, कुस्करूनहि गोड लागेना.
(६६५) आधी सुनवावें, मग गुतवावें, मग कुथवावें.
(६६६) सासरीं निघाली, अन् नथ विसरली.
(६६७) सुइणीच्या भरवशावर कोणी गरोदर राहत नाहीत.
(६६८) आपल्या खेटरावर जशी माया, तशी लोकांच्या लेकरावर नसते.
(६६९) ज्याची करावी कीव, तो घेतो जीव.
(६७०) जित्याला रोटी; नी मेल्याला मट्टी (माती).
(६७१) पदर लावूं नये नी नजर लावूं नये.
(६७२) मांजराचें राज्य काय तें उखळापर्यंत.
(६७३) बायको असेल तर धन्य, ती मेली की शून्य.
(६७४) शेजारणीने लाटलें नी मला नाही बरें वाटलें.
(६७५) मोळी सीता, अन् चोळी नेता.
(६७६) हजाराचा बसला घरीं, अन् दमडीचा ऊठ बस करी.
(६७७) नाजूक नार, मोत्यांचा हार, चाबकाचा मार.

—नीळकंठ शंकर नवरे

# साहित्यवार्ता

## गोमंतक

### १ गो. म. साहित्यसंमेलन

गोमंतक मराठी साहित्य संमेलनाचें दुसरें अधिवेशन मुंबअी येथे चिकित्सक समूह हायस्कूलच्या वागळे हॉलमध्ये ता. ६ व ७ फेब्रुवारी १९४३ या दिवशीं भरलें होतें. प्रथमाधिवेशन मडगांव येथे सन १९३५ सालीं श्री. वि. स. खांडेकर यांच्या अध्यक्षतेखालीं पार पडलें होतें. द्वितीयाधिवेशनाचें अध्यक्षस्थान श्री. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी मंडित केलें होतें. स्वागताध्यक्ष श्री. यशवंतराव सरदेसाअी हे असून कार्याध्यक्ष श्री. सुशील श्रीनिवास कवळेकर, अेम्.अे., अेल्अेल्.बी., हे होते. पहिल्या दिवशीं दुपारीं अध्यक्ष-स्वागताध्यक्ष यांचीं भाषणें होअून संध्याकाळीं नृत्यगानादि ललित कार्यक्रम झाला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं 'गोमंतकीयांचें ललितवाङ्मय वैकारिक असतें काय' या विषयावर चर्चा झाली. अध्यक्षस्थानीं तर्कतीर्थच होते. चर्चेत श्री. कवळेकर, श्री. दि. वि. आमोणकर, श्री. सातोस्कर अित्यादि गोमंतकीय आणि श्री. वरेरकर, श्री. माधव मनोहर, महाडचे श्री. हृदय, श्री. साक्रीकर, श्री. अनंतराव गद्रे अित्यादि गोमंतकीयेतर साहित्यिकांनी भाग घेतला. चर्चाभूत प्रश्नाला बहुतेक वक्त्यांनी नास्तिपक्षींच अुत्तर दिलें. चर्चेच्या अध्यक्षीय समारोपानंतर ठराव घेण्यांत आले. त्यांत महाराष्ट्र युनिव्हर्सिटीची मागणी, गोवा सरकारचें मराठीसंबंधीचें अनिष्ट धोरण बदलण्याची आवश्यकता अित्यादि ठराव महत्त्वाचे होते.

स्वागताध्यक्षांनी कोंकणी विरुद्ध मराठी या वादांत मराठीची बाजू कशी सबळ आहे तें थोडक्यांत पण अुत्तम रीतीनें दाखवून दिलें. अध्यक्ष तर्कतीर्थ जोशी यांनी वाङ्मयीन मूल्यांची मूलग्राही मीमांसा करून 'कलार्थ कला' वाद प्रस्थापित करण्याचा व्यवस्थित व जोरदार प्रयत्न केला. जावडेकर-फडके वादांत त्यांनी फडक्यांच्या मतांचें समर्थन केलेलें नाही. पण जावडेकरांच्या विचारसरणीचें खंडण तावातावानें केलेलें आढळतें. मात्र त्यांच्या भाषणांत गोमंतकासंबंधींहि कांहीं आलेलें नाही आणि मराठी साहित्यांतहि मार्गदर्शन नाही! अेखाद्या पदवीपरीक्षेसाठी अेक चिकित्सापूर्ण निबंध या दृष्टीनें त्याचें महत्त्व अतिशय मोठेंहि मानतां येअील. पण तें संमेलनाच्या— मग तें स्थानमर्यादित का असेना— अध्यक्षपदास साजणारें होतें असें म्हणतां यावयाचें नाही. स्वतः तें भाषणहि साहित्यगुणांच्या अभावानेच, विशेषतः त्याच्या क्लिष्टतेमुळेच, अधिक तळपणारें आहे असें वाटतें.

### २ साहित्यविषयक व्याख्यानमाला

मडगांव येथील 'सा. ब्रा. समाज' या संस्थेतर्फे होणारी वार्षिक व्याख्यानमाला यंदा ललितवाङ्मयाच्या ध्येयासंबंधी प्रचलित असलेल्या निरनिराळ्या वादांवर झाली. मालेचीं पुष्पें कारे व बोरकर हे कविद्वय आणि व्यंकटेश वि. वैद्य, जयवंतराव सरदेसाअी आणि लक्ष्मणराव सरदेसाअी यांनी गुंफलीं. व्याख्यानमाला ता. १२ ते १७ मार्च या दिवसांत झाली. शेवटच्या दिवशीं श्री. न. पु. सुंकेरकर, बी. अे., यांनी समारोप केला. अेकंदर

व्याख्यानमाला बरीच रंगली व व्याख्यानांनंतर अितर वक्त्यांनी चर्चेत भाग घेअून मराठी ललितसाहित्यासंबंधी श्रोत्यांत चांगली जागरूकता अुत्पन्न केली असें म्हणावयास हरकत नाही.

द. व्यं. पै

## मध्यहिंदुस्तान

### १ अिंदूर

दिनांक २९ डिसेंबर या दिवशीं नेक नामदार डॉ. बाबासाहेब जयकर यांचा साहित्य-सभेच्या नेतृत्वाखाली अिंदूर येथे महाराष्ट्रीय संस्थांकडून सन्मान करण्यांत आला. डॉ. जयकर यांनी महाराष्ट्र युनिव्हर्सिटीविषयी थोडक्यांत अुल्लेख करून महाराष्ट्रीयांत जागृति कां झाली पाहिजे हें सांगितलें. त्यांनी महाराष्ट्राच्या अेकीकरणाविषयीहि संदेश दिला.

दि. ३ जानेवारीस मशीरबहादूर व माळव्यांतील प्रसिद्ध कवि श्री. नरहर शंकर रहाळकर यांच्या षष्ट्यब्दपूर्तीचा समारंभ झाला. महाराष्ट्र साहित्य सभेने त्यांस मानपत्र अर्पण करून त्यांच्या मराठी भाषेंतील कार्याचा गौरव केला. वक्त्यांमध्ये रा. ब. तांबे, राज्य-भूषण भंडारी, श्री. सी. का. देव, देवासचे प्रसिद्ध साहित्यिक ग. कृ. गं. कवचाळे हे प्रामुख्याने होते. श्री. रहाळकर यांनी अुत्तरादाखल आभारप्रदर्शनात्मक भाषण केलें व साहित्यसभेस रु. १०० ची देणगी दिली.

दि. १६–१७ जानेवारीस महाराष्ट्रांतील कवि श्री. शं. के. कानेटकर, प्राध्यापक, वुअिलिंग्डन कॉलेज, सांगली, यांच्या अध्यक्षतेखाली अिंदूर खिश्चियन कॉलेजांतील तरुण महाराष्ट्र मंडळाचा वार्षिक संमेलनाचा कार्यक्रम झाला. अध्यक्षांनी 'मराठी भाषेचें भवितव्य' या विषयावर व्याख्यान दिलें.

दि. १७ ला सकाळीं साहित्यसभेंत त्यांचा सत्कार झाला. त्या प्रसंगीं काव्य व वाङ्मय यांचीं ध्येयें व त्या ध्येयांची सध्याच्या वाङ्मयीन संप्रदायांत आढळणारी पूर्ति यांविषयी चर्चा झाली.

दि. १४ मार्चला साहित्यसभेच्या नवीन सभागृहाचा गृहप्रवेशदिनोत्सव झाला.

अिंदूरच्या महाराष्ट्र साहित्य सभेने तांबे-स्मारक-समिति नेमली असून तिच्या कार्यासहि प्रारंभ झाला आहे.

### २ अुज्जैन

दि. २६–२७ फेब्रुवारीस महाराष्ट्र मंडळाचा वार्षिक अुत्सव बडोदें येथील प्रसिद्ध मराठी लेखक प्रा. चिं. वि. जोशी यांच्या अध्यक्षतेखाली झाला. प्रथम दिवशीं अध्यक्षांनी मराठी भाषेवर अितर भाषांकडून हळूहळू आक्रमण कसें होत आहे याचा सर्व बाजूंनी विचार केला. मराठी प्रांतांत मुंबअीस असणाऱ्या रेडियोवर मराठीस किती थोडें स्थान मिळतें हें त्यांनी सप्रमाण दाखविलें. संघटना व अेकी ही मराठी समाजाने योग्य वेळींच केली पाहिजे अशी सूचना त्यांनी केली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं 'सध्याचें मराठी वाङ्मय भारतीय संस्कृतीस विघातक आहे' या विषयावर चर्चा झाली. संध्याकाळीं कविसंमेलन झालें. दुसरे दिवशीं सायंकाळीं अध्यक्षांनी 'विनोद' या विषयावर दीड तास व्याख्यान दिलें. वाङ्मयांत विनोदाचा विचार करितांना प्रामुख्याने आपण कृत्रिम विनोदाचाच विचार करितों असें अध्यक्षांनी प्रतिपादिलें. विनोदाचीं कारणें काय आहेत व कोणत्या विनोदाचा आपण आस्वाद घेअूं शकतों याचाहि त्यांनी विचार केला.

### ३ ग्वाल्हेर

जानेवारीच्या शेवटीं व फेब्रुवारीच्या आरंभीं नागपूरचे श्री. बाळशास्त्री हरिदास यांचीं 'आर्योची संस्कृति' या विषयावर बारा प्रवचनें झालीं. त्यांचें स्वरूप केवळ धार्मिक नव्हतें; त्यांत साम्राज्यवाद, मार्क्सवाद, लोकसत्तावाद अित्यादींची चर्चाहि होती. कमलाराजा गर्ल्स कॉलेजचें नियतकालिक 'पद्मप्रभा' प्रथमच दि. १४ फेब्रुवारीस प्रकाशित झालें. मराठी विभागांत कांही वाङ्मयीन लेख आहेत. सध्या येथे शारदासंघाची वसंत व्याख्यानमाला चालू आहे. त्यांतील आठ व्याख्यानें स्त्रियांचीं आहेत. (जानेवारीपूर्वी ह. रा. दिवेकर यांचें 'ग्वाल्हेर' व मातृभूमि कार्यालयाने प्रकाशित केलेला 'भ्रमरगीत' हा काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला आहे. त्याचप्रमाणे 'दोन झरे' हा रा. वा. ग. तळेगांवकर आणि निशिकान्त कालगांवकर यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला आहे.)

### ४ देवास

दि. ६-७ मार्च या दिवशीं देवास (धाकटी पाती) येथे तांबे कवींच्या स्मरणार्थ श्रीमंत खासेसाहेब पवार यांच्या प्रेरणेने 'तांबे कवि सम्मेलन' मशीरबहादूर न. शं. रहाळकर यांच्या अध्यक्षतेखाली झालें. महाराजांच्या हस्तें तांबे यांच्या तैलचित्राचें अनावरण झालें. दिलेल्या विषयावर कविता करणारांना पारितोषिकें दिलीं. 'काव्याचा जीवनाशीं संबंध' या विषयावर चर्चा झाली.

म. अ. करंदीकर

---

## भाषाभगिनींचा संसार

### हिंदी

हिंदी साहित्य सम्मेलनाचें ३१ वें अधिवेशन हरिद्वार येथे दिनांक १७, १८, १९ मे ला भरणार आहे. अध्यक्षस्थानीं खांडवा येथील 'कर्मवीर'चे संपादक श्री. माखनलाल चतुर्वेदी हे निवडलेले आहेत.

गेल्या सहामाहींत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांपैकी प्रमुख पुस्तकें पुढीलप्रमाणे होत—

**बच्चोंकी कुछ समस्याअँ**— (ले. श्री. कालूलाल श्रीमाली). श्री. मालीजी यांची स्वतःची बालशाळा आहे व त्यांनी आपल्या अनुभवाच्या आधाराने विवेचन केलें असल्याने हें पुस्तक सुंदर झालें आहे. मानसशास्त्रावर जीं थोडीं पुस्तकें होतीं त्यांत या पुस्तकाने चांगली भर टाकली आहे. या पुस्तकांतील 'बच्चोंकी दुनिया', 'चिढ़नेवाला बच्चा', 'चिढ़ानेवाला बच्चा' हे पाठ शास्त्रीय असून मनोरंजक आहेत.

**विश्ववेदना**— (कवि- मैथिलीशरण गुप्त, चिरगांव, झांसी). गेल्या महायुद्धाच्या अखेरीस या काव्याचा आरंभ झाला व तें संपलें या युद्धाच्या वेळीं. युद्धांतील संकटांचें व साम्राज्यवादाचें वर्णन काव्यमय भाषेंत या पुस्तकांत केलेलें आहे. बिखरे फूल (कवि- रघुवीर शरण), मधुज्वाल (ले. तेज नारायण लाल) असे काव्यसंग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

**देशी राज्यशासन**— (ले. भगवानदास केला) हिंदुस्थानच्या राजकारणांत संस्थानिकांना आता महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे, त्यामुळे असें पुस्तक प्रसिद्ध होणें आवश्यक

होतें. पहिल्या भागांत अिंग्रज व संस्थानिक यांच्या संबंधाचें विवेचन केलें असून दुसऱ्या भागांत कांही निवडक संस्थानिकांच्या राज्यकारभाराची माहिती दिलेली आहे.

**मंदिर**— (नाटक. ले. श्री. हरि कृष्ण प्रेमी) सात अेकांकी नाटकांचा हा संग्रह आहे.

**कविदर्शन**— (मेनीमाधव शर्मा) प्रमुख लेखक व कवींची माहिती मुलाखतींच्या रूपाने देण्यांत आली आहे.

—मराठींतील 'शिवांचा शह' व 'महादजी शिंदे' (ले. चव्हाण) या पुस्तकांचा अनुवाद हिंदींत करण्यांत आला आहे.

—बंगाल हिन्दी मंडळ, दिल्ली, या संस्थेने विविध विषयांवर चांगलीं पुस्तकें प्रकाशित व्हावीं म्हणून अेकूण रु. ९००० चीं पारितोषिकें १२ पुस्तकांना व सहा विषयांना देण्याचें ठरविलें आहे.

—डॉ. गंगानाथ झा यांच्या स्मरणार्थ प्रयाग येथे हिंदुस्थानसंबंधी अध्ययन, शोध, प्रकाशन अित्यादि कार्य करण्यासाठी अेक संस्था स्थापावी अशी योजना करण्यांत आली आहे. तीन लाख रुपये जमविण्याचा संकल्प असून पंचेचाळीस हजार जमलेहि आहेत.

—मध्यंतरीं बंद झालेल्या 'आर्यावर्त' या बिहारमधील दैनिकाचें प्रकाशन पुनः सुरू झालें आहे.

—पुणें येथील हिंदी प्रचार संघाच्या वतीने गेल्या सहामाहींत दोनदा पहिल्या दोन परीक्षा घेण्यांत आल्या. त्यांस सुमारें ३०० विद्यार्थी बसले होते.

—द. भारत हिंदी प्रचार सभेने अध्ययन करणारांसाठी अधिक 'प्रबंध' लेखनद्वारा परीक्षा घेअून अुत्तीर्ण होणारांस 'राष्ट्रभाषारत्न' ही पदवी देण्याचें ठरविलें आहे.

शं. दा. चितळे

**कन्नड**

(१) जीवन, जयन्ती, प्रबुद्ध कर्नाटक व साहित्य परिषद् पत्रिका हीं नियतकालिकें नियमितपणें निघत आहेत.

(२) कागदाच्या तुटवड्यामुळे अडचण भासत असूनहि निरनिराळ्या ग्रंथमाला प्रकाशनाचें कार्य करीत आहेत.

(३) साहित्यपरिषदेच्या कार्यकारी मंडळाने कन्नड-कन्नड-कोष तयार करण्याचें ठरविलें आहे. त्याकरिता अेक स्थानिक व सार्वदेशीय समिति नेमिली आहे.

(४) म्हैसूरचे दिवाण माधवराव यांच्या हस्तें सी. वासुदेवय्या, बी. वेंकटनारायणप्पा व बी. रामराव यांचीं तैलचित्रें कन्नड साहित्य परिषदेमध्ये अनावृत झालीं. अुपरिनिर्दिष्ट व्यक्ति म्हैसूर व सबंध कर्नाटक या भागांत मान्यवर समजल्या जाणाऱ्या आहेत. शिमोग्याच्या साहित्य संघाने हासुदी वेंकटशास्त्री यांनी दिलेल्या अुदार देणगींतून बांधलेल्या साहित्यमंदिराचें अुद्घाटन म्हैसूरच्या महाराजांच्या हस्तें मार्चच्या पहिल्या आठवड्यांत झालें.

(५) प्रो. गोकाक यांनी लिहिलेल्या 'जीवनमंदिर' नामक नवीन धर्तीच्या काव्याचा प्रास्ताविक भाग 'जीवन'मध्ये प्रसिद्ध झाला आहे. जीवनमंदिरांत आपापल्या परीने जीवनाचा अर्थ लावूं पाहणाऱ्या अनेक व्यक्तींचीं चित्रें या काव्यांत आलेलीं आहेत.

रं. श्री. मुगळी

## गेल्या तिमाहींमधील मराठीचा साहित्यसंसार

(१) तात्त्विक चर्चा आणि अितर लेखः—

(१) साहित्य आणि रसब्रह्म, ले. रा. ना. वळे सह्याद्रि, फेब्रु. १९४३
(२) शील व साहित्य, ले. वि. श्री. गोठोस्कर मनोहर, अेप्रिल ,,
(३) युद्धकालीन साहित्याची तेजस्विता, ले. दा. वि. गोखले, सह्याद्रि, फेब्रु. ,,
(४) कविमन, ले. प्रभाकर माचवे ,, मार्च ,,
(५) युद्धकालांतील काव्योत्पादन, ले. ना. मा. संत ,, अेप्रिल ,,
(६) मराठींतील अपौरुषेय वाङ्मय, ले. कमळाबाअी देशपांडे ,, ,, ,,
(७) भावी महाराष्ट्र विद्यापीठ, ले. न. चिं. केळकर ,, फेब्रु. ,,
(८) मराठींत क्रान्तिगीतांची परंपरा कां नाही
ले. दि. वा. फडणीस, मनोहर, फेब्रु. ,,
(९) रघु-कुमार, ले. ना. ग. जोशी चित्रमयजगत्, फेब्रु. ,,
(१०) भर्तृहरीच्या काव्यांतील वैराग्यवृत्ति, ले. दा. ध. कोसंबी ,, अेप्रिल ,,
(११) मराठीच्या पीछेहाटीचें अेक कारण, ले. चिं. वि. जोशी, अभिरुचि, ,, ,,
(१२) शाहिरी काव्याचें अैतिहासिक महत्त्व, ले. व. दी. राव, मनोहर, मार्च ,,
(१३) महाराष्ट्रांतील मुस्लीमांची मातृभाषा मराठीच
ले. आयू. सी. शेख, धनुर्धारी, मार्च ,,

(२) ग्रंथपरीक्षणेंः—

(१) 'स्वतंत्र भारताचे द्रष्टे', ले. शं. के. कानेटकर यशवंत, मार्च १९४३
(२) आजचे युगकवि— कुसुमाग्रज, ले. प्र. पाध्ये धनुर्धारी, ३ अेप्रिल ,,

(३) समालोचनः—

(१) १९४२ सालचें मराठी वाङ्मय, (लेखांक २ रा)
ले. वा. कृ. गलगली ध्रुव, फेब्रु. १९४३

(४) साहित्यिकांचा परिचयः—

(१) प्रा. वा. म. जोशी यांची वाङ्मयसेवा, ले. निरंतर सह्याद्रि, मार्च १९४३
(२) ,, ,, ,, ,, ,, ,, ले. गो. वा. पाध्ये, यशवंत, अेप्रिल ,,
,, ,, ,, ,, ,, ,, महा-राष्ट्र, फेब्रु. ,,
(३) गोपाळ हरि देशमुख, ले. मा. का. देशपांडे किर्लोस्कर, मार्च ,,
(४) श्री. के. ना. डांगे, ले. व. अ. काळेले मनोहर, अेप्रिल ,,
(५) श्री. पां. वा. गाडगीळ, ले. र. गो. सरदेसाअी ,, मार्च ,,

(५) अुल्लेखनीय ग्रंथप्रकाशनः—

(१) पालापाचोळा, निबंधसंग्रह ले. न. चिं. केळकर
(२) आस्वाद, ले. द. सी. पंगु, टीकालेख
(३) मीनाक्षीचें जीवन, ले. कृष्णाबाअी मोटे, कादंबरी

(६) साहित्यसेवकांचे मृत्युः—

(१) श्री. वि. पां. नेने, २ फेब्रु. १९४३, बडोदें येथे
सं. अर्वाचीन मराठी साहित्य.

(२) श्री. वा. अ. बांबर्डेकर, ३ फेब्रु. १९४३, वांद्रें येथे
ले. मठगांवचा शिलालेख, मट्टोजी दीक्षित अित्यादि.
(३) श्री. यादव माधव काळे, ११ मार्च १९४३
ले. वऱ्हाडचा अितिहास, गोंडांचा अितिहास, शशिसेना काव्य अित्यादि.
(४) श्री. मो. स. मोने, १५ अेप्रिल १९४३, पुणें येथे
ले. मराठी भाषेचे व्याकरणकार, मराठी साहित्य व व्याकरण अित्यादि.
(५) श्री. य. ना. टिपणीस, २५ मार्च १९४३, मुंबअी येथे
ले. चंद्रग्रहण, शिकाकट्यार, आशानिराशा अित्यादि.

---

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## १९४२ चें इतिवृत्त

वर्षारंभीं पटावरील सभासदांची संख्या ९३३ होती. या वर्षी अेकूण २११ सभासदांचीं नांवें राजीनाम्यामुळे व वर्गणी थकल्यामुळे पटावरून कमी करावीं लागलीं. शिवाय मृत्यूमुळे १ तहहयात सभासद व ४ साधारण सभासद असे पुढील अेकूण ५ सभासद गळाले:—(१) श्री. जगन्नाथ अेकनाथ नरवणे, पुणें (तहहयात); (२) सौ. आनंदीबाअी किर्लोस्कर, किर्लोस्करवाडी; (३) रा. ब. दामोदर गणेश पाध्ये, मुंबअी; (४) प्रा. श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर, पुणें व (५) श्री. अ. पां. भाटे.

या वर्षी ८ तहहयात व १३४ साधारण याप्रमाणे अेकूण १४२ नवीन सभासद मिळाले. वर्गबदलीने ४ साधारण सभासद तहहयात वर्गात प्रविष्ट झाले. (या अेकूण १२ तहहयात सभासदांत पटवर्धन स्मारक निधीस किमान रु.५० ची देणगी देणाऱ्या सहा गृहस्थांचा समावेश झालेला आहे.) वर्षाच्या शेवटीं सभासदांची खालीलप्रमाणे संख्या पटावर आहे:—

अुपकर्ते १, आश्रयदाते ३, साहाय्यकर्ते १, हितचिंतक १७, तहहयात १८२ व साधारण ६५५; अेकूण ८५९. साधारण सभासदांपैकी बाकीदार सभासदांची संख्या अेकूण १२२ अेवढी आहे.

या वर्षी पुणें नगर वाचन मंदिर ही अेकच संस्था परिषदेशीं संलग्न झाली असून संलग्न संस्थांची पटावरील संख्या २७ आहे.

**देणग्या**—परिषदेच्या अेकंदर अिमारतीचा भाग म्हणून बांधण्यांत आलेल्या 'माधवराव पटवर्धन साहित्यमंदिरा'च्या बांधकामास आलेल्या खर्चापैकी रु. १०२९३-४-० अेवढा खर्च चालू वर्षी स्मारकसमितीने भागविला. ही रक्कम समितीकडील देणगी म्हणून जमा करण्यांत आलेली आहे. याशिवाय (१) प्रा. सखाराम विनायक आपटे, पुणें; (२) प्रि. बाबूराव गणपतराव जगताप, पुणें; (३) श्री. वामन प्रभाकर ओक, ठाणें; (४) प्रा. मोहनीराज लक्ष्मण चंद्रात्रेय, पुणें; व (५) प्रा. धुंडिराज गोविंद विनोद, पुणें; या गृहस्थांकडून प्रत्येकीं रु. ५० प्रमाणे अेकूण रु. २५० अिमारतनिधीसाठी देणगी म्हणून मिळाले.

सोलापूर येथील महाराष्ट्र साहित्य संमेलन-स्वागतमंडळाकडून रु. २०० ची देणगी परिषदेस मिळाली.

पटवर्धन स्मारक समिति, सोलापूर संमेलन स्वागत मंडळ व वरील सर्व देणगीदार यांची परिषद् आभारी आहे.

**आर्थिक परिस्थिति**— या अितिवृत्तास जोडलेल्या जमाखर्चाचा तक्ता, पडताळा व ताळेबंद यांवरून परिषदेची आर्थिक परिस्थिति सभासदांस कळून येअील.

'माधवराव पटवर्धन साहित्यमंदिरा'च्या अिमारतीच्या बांधकामास अेकूण खर्च रु. २१११०-१-० अेवढा आला. मंदिरांतील सामानाबद्दल रु. ६८८ खर्च झाले. पटवर्धन स्मारक समितीची देणगी रु. १०२९३-४-०, परिषदेजवळील अिमारतनिधीची रक्कम रु. ३०१९ व ता. १६ ऑगस्ट १९४२ साधारण सभेच्या आदेशानुसार अिमारतीसाठी काढलेल्या कर्जापैकी (रु. ९२००) कांही रक्कम मिळून अेकूण रु. १९११०-१-० अेवढी रक्कम ठेकेदारांस पावती झाली. अद्याप रु. २००० अेवढ्या रकमेची भरपायी ठेकेदारांकडे व्हावयाची असून 'मंदिरां'तील सामान खरेदीच्या रकमेपैकी १८८ ची रक्कम अद्याप द्यावयाची आहे.

या वर्षी कार्यकारी मंडळाच्या ९ (८ साधारण + १ विशेष), नियामक मंडळाच्या ३, वार्षिक साधारण १, व विशेष साधारण १ याप्रमाणे सभा भरविण्यांत आल्या.

**पत्रिका**— म. सा. पत्रिकेचे या वर्षी प्रसिद्ध व्हावयाचे सर्व अंक प्रसिद्ध करण्यांत आले. पत्रिकेस लेखनसाहाय्य करून ज्यांनी अुपकृत केलें त्या सर्वांची परिषद् आभारी आहे.

**परीक्षा**— गतवर्षाप्रमाणे यंदाहि प्राज्ञ व विशारद या परीक्षा डिसेंबरांत घेण्यांत आल्या. प्राज्ञ परीक्षेसाठी १०१ व विशारद परीक्षेसाठी २६ याप्रमाणे अुमेदवारांचे अर्ज आले होते. या वर्षी मुंबअी, पुणें, नागपूर या कायमच्या केंद्रांखेरीज दक्षिण हैदराबाद, औरंगाबाद, आंबेजोगाअी (निजाम), जळगांव व पंढरपूर अशा पांच नवीन ठिकाणीं केंद्रें ठेवण्यांत आलीं होतीं. केंद्राची व्यवस्था पाहण्याची व त्या कामीं अखेरपर्यंत साहाय्य करून केंद्राधिकाऱ्याची जबाबदारी पुढील गृहस्थांनी स्वीकारली:—(१) श्री. माधव मनोहर, मुंबअी; (२) प्रा. वा. मा. दबडघाव, पुणें; (३) प्रि. दामोदर केशव ओक, नागपूर; (४) प्रा. चिंतामण नीळकंठ जोशी, दक्षिण हैदराबाद; (५) श्री. अेस्. व्ही. पिंगळे, औरंगाबाद; (६) श्री. मी. भ. खेडगीकर, आंबेजोगाअी; (७) श्री. मनुभाअी देसाअी, जळगांव; (८) श्री. गो. गो. नेने, पंढरपूर.

तसेंच पुढील गृहस्थांनी परीक्षक होण्याचें मान्य करून या कामीं सर्व प्रकारचें साहाय्य दिलें:—(१) श्री. गंगाधर माअुराव निरंतर, पुणें; (२) सौ. प्रा. मुक्ताबाअी दीक्षित, पुणें; (३) प्रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार, पुणें; (४) प्रा. नीलकंठ शंकर नवरे, पुणें; (५) श्री. हरि नारायण नेने, नागपूर; (६) डॉ. गंगाधर बळवंत ग्रामोपाध्ये, पुणें; (७) प्रा. वामन मल्हार जोशी, पुणें; (८) श्री. श्रीपाद महादेव वर्दे, मुंबअी; (९) प्रा. वासुदेव दामोदर गोखले, पुणें; (१०) प्रा. श्रीपाद रामचंद्र पारसनीस, पुणें; (११) प्रा. द. के. केळकर, मुंबअी; (१२) प्रा. डॉ. केशव नारायण वाटवे, पुणें; (१३) प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग, पुणें; (१४) प्रा. डॉ. महेश्वर अनंत करंदीकर, अिंदूर; (१५) प्रा. श्रीनिवास नारायण बनहट्टी, नागपूर; (१६) प्रा. अवधूत महादेव जोशी, अुजयिनी.

प्रतिवर्षाप्रमाणे अुमेदवारांच्या शिक्षणासाठी वर्ग चालविले व विद्वानांचीं व्याख्यानें हि करविलीं. या कामीं पुढील गृहस्थांचें साहाय्य झालें:—(१) प्रा. वा. म. जोशी, (२) प्रा.

रा. श्री. जोग, (३) प्रा. गं. बा. सरदार, (४) प्रा. श्री. रा. पारसनीस, (५) डॉ. के. ना. वाटवे, (६) श्री. गं. भा. निरंतर, (७) प्रा. वा. दा. गोखले, (८) श्री. ह. श्री. शेणोलीकर.

यंदा पुणें केंद्रांतील विशारदेच्छुकांनी परीक्षेनंतर स्नेहसंमेलनाचा अेक कार्यक्रम घडवून आणला. अशा तऱ्हेचा कार्यक्रम परिषदेच्या अितिहासांत पहिलाच होय. या कामीं श्री. चौधरी, श्री. जोशी, श्री. वळे वगैरे विद्यार्थ्यांनी बरेच श्रम घेतले, व परीक्षेपूर्वी व्याख्यानें वगैरे ठरवण्याच्या कामीं परिषदेच्या कार्यकर्त्यांस स्वयंस्फूर्तीने साहाय्य दिलें.

वरील सर्व अुल्लिखित साहाय्यकर्त्यांनी विनामूल्य साहाय्य दिलें. याशिवाय या कामीं अनेकांची मदत परिषदेस झाली असून या सर्वांची परिषद् आभारी आहे.

परिषदेने १९४३ सालापासून प्रथमा व प्रवेश अशा दोन नवीन परीक्षा घेण्याचें ठरविलें असून त्याबद्दलचे नियम व अभ्यासक्रम चालू वर्षी तयार केले.

**अुपसमित्या**—परिषदेने योजिलेलीं कामें पार पाडण्याकरिता नेमिलेल्या अुपसमित्यांचीं कामें यथाशक्य चालू होती. परिभाषा चर्चामंडळ व व्याकरणसमिति यांच्या कार्याचें वृत्त या अितिवृत्तास स्वतंत्रपणें जोडलें आहे.

**संमेलन**—महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें २६ वें अधिवेशन ता. ३०, ३१ ऑक्टोबर व १ नोव्हेंबर दिवशीं नाशिक येथे आचार्य प्रल्हाद केशव अत्रे यांच्या अध्यक्षतेखालीं यशस्वी रीतीने पार पडलें. संमेलनाने अेकूण १९ प्रस्ताव मान्य केले असून त्यांची शक्य ती अंमलबजावणी होत आहे.

सोलापूर संमेलन स्वागतमंडळाने सोलापूर संमेलनाचें अितिवृत्त प्रसिद्ध केलें आहे.

**शाखा सभा**—मध्यप्रांत शाखासभा, नागपूर, व दक्षिणी संस्थान साहित्यसभा, सांगली, या परिषदेच्या शाखासभांचें कार्य नियमित चालू आहे. पैकीं मध्यप्रांत शाखासभेचें वृत्त सदर शाखासभेच्या चिटणिसांकडून आल्यावरून या अितिवृत्तास स्वतंत्रपणें जोडलें आहे.

या वर्षी सोलापूर येथे परिषदेच्या घटनेप्रमाणे त्या प्रादेशिक गटाची अेक नवीन शाखासभा स्थापन करण्यांत आली. या कामीं श्री. बाबूराव जक्कल, श्री. द. ब. मुद्गल, श्री. वि. भि. साठे अित्यादींनी जे परिश्रम घेतले त्याबद्दल परिषद् त्यांची आभारी आहे.

**पैठणकर पारितोषिक**—श्री. द. ग. काळे, पारनेर, यांनी आपल्या श्वशुरांच्या नांवें ठेविलेलें रु. १०० चें पारितोषिक 'मराठीचें साहित्यशास्त्र' या डॉ. माधव गोपाळ देशमुख यांच्या ग्रंथास (हा अेकच ग्रंथ परिषदेकडे आल्याने व तो बक्षिसार्ह ठरल्याने) देण्यांत आलें.

**अितर**—परिषदेच्या अिमारतीचा अेक भाग म्हणून बांधण्यांत आलेल्या 'माधवराव पटवर्धन साहित्य मंदिरा'च्या अिमारतीचें काम पूर्ण होअून या मंदिराचा अुद्घाटनसमारंभ ता. ३० नोव्हेंबर १९४२ दिवशीं श्रीमंत मेजर सर मालोजी राजे निंबाळकर, अधिपति संस्थान फलटण, यांच्या हस्तें करण्यांत आला.

प्रतिवर्षाप्रमाणे स्नेहसंमेलन, पाहुण्यांच्या भेटी, स्मृतिदिन, व्याख्यानें अित्यादि कार्यक्रमांची यथाशक्य योजना होत असते.

**चिटणीस**
म. सा. परिषद्

## मराठी-व्याकरणसमितीचें सन १९४२ सालचें अितिवृत्त

चालू सालीं श्री. फके यांस समितीचे अध्यक्ष व श्री. परांजपे यांस कार्यवाह म्हणून नेमण्यांत आलें. चालू सालीं समितीच्या साधारण सभा बारा आणि दोन निर्णयसभा १४, १५ फेब्रुवारी व ७, ८ मे रोजीं झाल्या. २८ मे रोजीं बोलाविलेली निर्णयसभा निमंत्रणें वेळेवर पाठवितां न आल्याने रहित करावी लागली. कांही अपरिहार्य कारणामुळे अधिक निर्णयसभा बोलावितां आल्या नाहीत.

चर्चासभांत वाक्यरचना, विरामचिन्हें, अव्ययांचें वर्गीकरण आणि वाक्यांतील अुद्देश्य या विषयांवर चर्चा झाली.

निर्णयसभांत व्याकरणसमितीच्या तोंपर्यंत झालेल्या चर्चेचा सारांश म. सा. पत्रिकेच्या ५८ व्या अंकांत छापलेल्या सारांशाचा विचार करून त्याविषयी निर्णय झाले. त्या निर्णयांप्रमाणे त्या सारांशाचें आता अधिकृत रूप कसें होअील तें पुरवणीरूपाने प्रसिद्ध करावयाचें आहे.

वा. गो. परांजपे
कार्यवाह

## परिभाषा चर्चा मंडळ

### १९४२ सालचें अितिवृत्त

अहवालाच्या वर्षी 'चर्चा मंडळा'चें कार्य पूर्वीसारखेंच निर्वेधपणें चालू होतें. या वर्षी मंडळाच्या अेकंदर बारा सभा झाल्या. पैकी पांच सभांतून 'सभाकार्य'विषयक परिभाषेवर चर्चा होअून ती प्रा. स. वि. आपटे यांच्या अेतद्विषयक लेखासह 'पत्रिकें'तून प्रसिद्ध करण्यांत आली. आंकडेशास्त्र(Statistics)विषयक परिभाषेवरील चर्चेसाठी सहा बैठकी झाल्या. या बैठकींतून साधारणतः नेहमी अुपयोगी पडेल अशी संख्यायन(आंकडेशास्त्र)विषयक मूलभूत परिभाषा निश्चित झाली. ती अद्याप प्रसिद्ध व्हावयाची आहे. रा. ब. डॉ. द. ल. सहस्रबुद्धे यांनी लिहिलेल्या 'सूक्ष्मसृष्टि' या पुस्तकांतील परिभाषेवर चर्चा करण्यासाठी अेक सभा झाली. लेखकानें या पुस्तकांत अेकसूत्री परिभाषा बनविण्याचा वा वापरण्याचा प्रयत्न न करतां बरीच शिथिलता स्वीकारली आहे असें आढळलें.

परिभाषाविषयक प्रश्नांचा व्यापक दृष्टीने विचार करण्यासाठी चालू सालीं अेखादी परिभाषापरिषद् भरवावी असें गतवर्षी ठरून त्याप्रमाणे कार्याला थोडीशी सुरवातहि झाली होती. तथापि चालू परिस्थितीचा विचार करतां ही कल्पना तूर्त स्थगित करावी लागली.

त्र्यं. गो. ढवळे
कार्यवाह
परिभाषा चर्चा मंडळ.

ता. १४।३।४३

## मध्यप्रांत शाखा

### (अहवाल)

**मोडी लिपी—**

प्राथमिक शाळेच्या अभ्यासक्रमांत मोडी लिपीचा पुनरपि समावेश व्हावा म्हणून शाखेने मध्यप्रांत सरकारच्या शिक्षणखात्याकडे ता. ८-१०-१९४१ रोजीं पत्र पाठविलें होतें.

त्यानंतर कार्यकारी मंडळाने ता. २६-७-४२ रोजीं ठरविल्याप्रमाणे सरकारच्या शिक्षणखात्याचे अंडर सेक्रेटरी यांची चिटणिसांनी भेट घेतली. अंडर सेक्रेटरी यांनी सांगितलें की निरनिराळ्या प्रमुख व्यक्तींकडून व शिक्षणसंस्थांकडून या विषयावर माहिती व मतें मागविलीं आहेत. ती बहुतेक आलीं आहेत व या प्रश्नाचा सरकार विचार करीत आहे. तेव्हा हा प्रश्न सहानुभूतीने लौकरच निकालांत निघेल व मोडीचा लोप होणार नाही अशी आशा बाळगण्यास जागा आहे.

**प्राज्ञ व विशारद परीक्षा—**

प्राज्ञ व विशारद या परीक्षांस प्रतिवर्षी चार-पांच विद्यार्थी अर्ज करतात. त्यांना शक्य ती मदत शाखेकडून दिली जाते. अभ्यासक्रमाचीं पुस्तकें विद्यार्थ्यांच्या माहितीसाठी व केव्हा केव्हा अुपयोगासाठी शाखेजवळ असणें अत्यवश्य आहे. त्या दृष्टीने कांही दुर्मिळ पुस्तकें विकत घेण्याचें सर्वसाधारण सभेने मंजूर केले आहे. याचा विद्यार्थ्यांना चांगला अुपयोग होअून त्यांची संख्या वाढण्यास मदत होणार आहे.

**नभोवाणी केंद्र—**

मध्यप्रांतांत नागपूर येथे नभोवाणी केंद्र अुघडण्याबद्दल तसेंच पुणें येथेंहि अेक केंद्र अुघडण्याबद्दल शाखेतर्फे हिंदुस्थान सरकारकडे अर्ज करण्यांत आला आहे.

**कै. माधवराव पटवर्धन स्मारक निधि—**

पटवर्धन स्मारक समितीच्या आदेशाप्रमाणें मध्यप्रांत शाखेने अेक स्थानिक समिति नेमून श्री. मो. धों. हिंगवे यांना कार्यवाह नियुक्त केलें. त्यांनी रु. ३०० पर्यंत निधि जमा केला. या निधीला श्री. मो. शा. शहाणे यांनी रु. १०० ची भरीव देणगी दिली.

**मराठी पुस्तकें—**

रत्नागिरीच्या साहित्य संमेलनाने अि. स. १९४० सालीं केलेल्या ठरावानुसार प्रांतिक सरकारांकडे येणाऱ्या मराठी पुस्तकांची अेक अेक प्रत मध्यप्रांत सरकारने मराठी वाचकांच्या व अभ्यासकांच्या सोयीसाठी येथील राजाराम वाचनालयासारख्या अेखाद्या मध्यवर्ती संस्थेकडे द्यावी म्हणून शाखेने मध्यप्रांत सरकारकडे पत्रव्यवहार केला आहे. या बाबतींत या प्रांताचे सरकारी प्रकाशनाधिकारी श्री. मो. शा. शहाणे यांचें सहकार्य मिळवून रत्नागिरीच्या ठरावाची अम्मलबजावणी करण्याचा शक्य तेवढा प्रयत्न करण्याचें शाखेने निश्चित केलें आहे.

**जमाखर्च—**

शाखेचा ता. १३-९-४२ पर्यंतचा जमाखर्च खालीलप्रमाणे आहे.

| | रु. | आ. | पै |
|---|---|---|---|
| अेकूण जमा | १०८ | १३ | ० |
| खर्च | १७ | ५ | ० |
| शिल्लक | ९१ | ८ | ० |

ता. १५।३।१९४३

रघुनाथ विठ्ठल कुलकर्णी
चिटणीस, म. सा. परिषद्
मध्यप्रांत शाखा, नागपूर

# सोलापूर-साहित्य-समिति

## (१९४२ चा अहवाल)

१९४१ चें म. सा. सं. चें रौप्यमहोत्सवाचें अधिवेशन झाल्यावर सोलापूर प्रांतांत वाङ्मयीन कार्य चालावें म्हणून सोलापूर-साहित्य-समिति (परिषदेची शाखा म्हणून) स्थापन करण्यांत आली. सभेस ६४ सभासद मिळून ११ सभासदांचें अेक कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें. अेकंदर कार्याची रूपरेखा, स्थानिक परिस्थिति वगैरे गोष्टी लक्षांत घेअून योजलेली घटना म. सा. परिषदेकडून मंजूर झाल्यावर रीतसर शाखासभेच्या कार्यास सुरवात झाली.

ह्याच सालीं सोलापूर संमेलनाचा अहवाल लिहून प्रसिद्ध करण्याचेंहि जिकीरीचें कार्य हातांत असल्याकारणाने व अितर पत्रव्यवहार बराच असल्याकारणाने फारसें महत्त्वाचें कार्य झालें नाही. तथापि नवीन अुपक्रम म्हणून येथील निरनिराळ्या शाळांतून खासगी रीतीने चालविलेलीं अशीं तीन चार हस्तलिखित नियतकालिकें परीक्षणाकरिता आलीं होतीं त्यांस रीतसर अभिप्राय देण्यांत आले. त्याचप्रमाणे अेक हस्तलिखित लघुकथासंग्रह, दोन कवितासंग्रह चिटणीसांकडे अभिप्रायार्थ आले होते ते योग्य त्या अधिकाऱ्यांकडून वाचवून अभिप्राय देण्यांत आले.

कवि 'केशवसुतां'च्या स्मृतिदिनानिमित्त त्यांच्या काव्यावर निबंध मागवून त्यांतील चांगल्या ठरलेल्या निबंधास येथील सरस्वतीमंदिराचे सुपरिंटेंडन्ट व कै. केशवसुतांचे पुतणे श्री. दामले यांनी रु. तीन बक्षिसासाठी दिले. तें बक्षिस निबंधलेखकांस देण्यांत आलें.

नाशिक संमेलन सभेंत झालेल्या ६ व्या ठरावान्वयें येथील प्राथमिक, दुय्यम मुख्य शिक्षणसंस्थांच्या चालकांना त्यांच्या संस्थेंतील असलेलीं वाङ्मयमंडळें सोलापूर साहित्य-समितीस संलग्न करून घेण्याची विनंती करण्यांत आली आहे. कांही मंडळें १९४३ पासून संलग्न होतील व कांही नवीन मंडळें अस्तित्वांत येतील व नंतर संलग्न होतील अशी आशा आहे.

संमेलनाच्या अुर्वरित निधींपैकी १००१ रु. च्या निधींतून मिळालेल्या व्याजांतून कांही नवीन अुपक्रम पुढील वर्षी करावयाचा आहे.

शाखा सभेच्या अेकंदर चार सभा होअून त्यांमध्ये श्रीमंत मातोश्री डॉवेजर राणीसाहेब, अक्कलकोट, यांच्या निधनाचा ठराव, येथील साहित्यिका कु. शशिकला आळंदकर यांनी नाशिक संमेलनास ठेवलेला रौप्यसाहित्यसूर्य यात्रद्दलचा अभिनंदनाचा ठराव, कवि केशवसुतांचा स्मृतिदिन, नाशिक संमेलनाचा वृत्तान्त वगैरे कामें झालीं.

पुढील वर्षी जास्त रीतसर काम होअील असें अुत्साही वातावरण निर्माण झालें आहे.

ता. १२-१२-१९४२

द. व. मुद्गल
चिटणीस
सोलापूर-साहित्य-समिति

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद

## जमाखर्च १९४२

### जमा

| | | | |
|---|---|---|---|
| १९२४-४-० | साधारण समासद वर्गणी— | | |
| | १९४२ | १८७६-४-० | |
| | १९४३ | ४८-०-० | |
| | | १९२४-४-० | |
| १०२-१२-० | पत्रिका वर्गणी— | | |
| | १९४२ | ९८-४-० | |
| | १९४३ | ४-८-० | |
| | | १०२-१२-० | |
| ६७-४-० | संलग्न संस्था वर्गणी | | |
| १२८-९-६ | ग्रंथविक्री | | |
| २००-०-० | सोलापूर साहित्य संमेलन देणगी | | |
| ७६२-११-१ | व्याज | | |
| | ट्रस्टी | ७५०-०-० | |
| | खजिनदार | १२-११-१ | |
| | | ७६२-११-१ | |
| ७६९-५-३ | परीक्षा शुल्क अित्यादि | | |
| ३३-६-० | किरकोळ जमा | | |
| ३८०-०-५ | तूट | | |
| ४३६८-४-३ | अेकूण | | |

### खर्च

| | | |
|---|---|---|
| १०४४-५-६ | कचेरी खर्च | |
| | पगार | ८०४-१४-३ |
| | प्रॉव्हि. फंड | ४२-४-६ |
| | टपाल | ९३-५-९ |
| | वीज | २१-०-९ |
| | सादिल | २७-१०-३ |
| | किरकोळ छपाअी | ३१-४-० |
| | म्युनि. कर | ५-३-० |
| | लिखाअी | २-५-० |
| | भुईभाडें | १५-०-० |
| | चेक बट्टा | १-२-० |
| | वर्गणी वसूली खर्च | ०-४-० |
| | | १०४४-५-६ |
| २३१८-५-९ | पत्रिका खर्च. | |
| | छपाअी | १९८९-१-० |
| | टपाल | ३२९-४-९ |
| | | २३१८-५-९ |
| १८८-३-० | परीक्षा | |
| ९५-१५-६ | प्रवास प्रचार | |
| ९२-४-६ | किरकोळ | |
| ५९-७-० | संमेलन ठराव अंमलबजावणी | |
| २१०-१०-६ | निवडणूक | |
| ४१-९-९ | संमेलन खर्च | |
| २१-०-० | द. सं. शाखा सभा देणगी | |
| १२८-१०-० | शाखासभांस दिलेली रक्कम | |
| १५०-२-३ | माधवराव पटवर्धन साहित्य मंदिर उद्घाटण | |
| १०-२-० | अुपसमिति | |
| ७-८-६ | किरकोळ सामान | |
| ४३६८-४-३ | अेकूण | |

म. सा. प. (१६-२-९)

अनुक्रमणिका





## महाराष्ट्र-साहित्य-परिषद् : ताळेबंद १९४२

**निधि व देणें**

| | | |
|---|---|---|
| ९८७४-०-५ | सामान्य निधि | |
| | १९४१ अखेर | १०२५४-०-१० |
| | वजा तूट १९४२ | ३८०-०-५ |
| | | ९८७४-०-५ |
| ३०१९-०-० | अिमारत निधि | |
| | १९४१ अखेर | ९५०-०-० |
| | १९४२ ,, | २५०-०-० |
| | ट्रस्टींकडून (१९४२) | १८१९-०-० |
| | | ३०१९-०-० |
| ५०-०-० | तहहयात सभासद वर्गणी | |
| १०२९३-४-० | पटवर्धन स्मारक समिति देणगी | |
| ९२००-०-० | अिमारत कर्ज | |
| २१८८-०-० | अिमारत देणें (ठेकेदार) | |
| | महाराष्ट्र कन्स्ट्र. कंपनी | २०००-०-० |
| | विश्वकर्मा सायं. वर्क्स | १८८-०-० |
| | | २१८८-०-० |
| ५००-०-० | ठेकेदाराचें डिपॉझिट | |
| २५९-१-० | देसवंडीकर प्रॉव्हिडंट फंड | |
| ३५३८३-५-५ | अेकूण | |

**जिंदगी व येणें**

| | | | |
|---|---|---|---|
| २४५६-४-५ | रोख शिल्लक- | | |
| | खजिनदार | २४०९-३-१ | |
| | चिटणीस, पो. तिकिटें | ४७-१-४ | |
| | | २४५६-४-५ | |
| २८९७६-९-६ | अिमारत | १९४१ अखेर | ७८६६-८-६ |
| | | १९४२ मधील | २१११०-१-० |
| | | | २८९७६-९-६ |
| ६१६-०-९ | कार्यालय सामान | | |
| ६८८-०-० | माधवराव पटवर्धन सा. मंदिर सामान | | |
| १३६०-७-३ | ट्रस्टी (तहहयात सभासद वर्गणी) | | |
| १२७-१५-६ | ट्रस्टी (अिमारत निधि) | | |
| ५००-०-० | आर्यसंस्कृति मुद्रणालय | | |
| ५००-०-० | पटवर्धन स्मारक समिति (ठेकेदारांचें डिपॉझिट) | | |
| ७७-०-० | डॉ. अ. ना. भालेराव | | |
| ६०-०-० | कारकून अनामत | | |
| २१-०-० | किरकोळ येणें | | |
| ३५३८३-५-५ | अेकूण | | |

**हिशेबतपासनिसांचा शेरा**— महाराष्ट्र साहित्य परिषदेचे पुणेंकचेरीचे ता. ३१-१२-१९४२ अखेर पुऱ्या होणाऱ्या वर्षाचे हिशेब मीं तपासले. हिशेब चांगल्या तऱ्हेने ठेविले आहेत. मला पाहिजे असलेली माहिती व खुलासे मला मिळाले. सदरहू जमाखर्च परिषदेच्या पुणें-कचेरीच्या येण्या-देण्याची व जमाखर्चांची योग्य ती वस्तुस्थिति दाखवीत आहेत. अिमारत व सामान यांवर घसारा अजून लिहिलेला नाहीं. पुढील सालापासून तो काढण्याची तरतूद करावी अशी माझी सूचना आहे.

(सही) म. वि. गोखले–हिशेबतपासनीस, १५-४-४३

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## अंदापत्रकाशीं जमाखर्चाचा पडताळा (१९४२)

| अुत्पन्न | अंदाज-पत्रकाप्रमाणे | प्रत्यक्ष | अंतर | खर्चबाब | अंदाज-पत्रकाप्रमाणे | प्रत्यक्ष | प्रत्यक्ष |
|---|---|---|---|---|---|---|---|
| साधारण सभासद वर्गणी | २००० | १८७६-४-० | -१२३-१२-० | कचेरी खर्च | ११९० | १०४४-५-६ | -१४५-१०-६ |
| ,, ,, १९४३ | ० | ४८-०-० | + ४८-०-० | पत्रिका खर्च | २००० | ३३१८-५-९ | +३१८-५-९ |
| पत्रिका वर्गणी | ६० | ९८-४-० | + ३८-४-० | परीक्षा | १५० | १८८-३-० | + ३८-३-० |
| ,, ,, १९४३ | ० | ४-८-० | + ४-८-० | प्रवास प्रचार | १५० | ९५-१५-६ | - ५४-०-६ |
| संलग्न संस्था वर्गणी | ७५ | ६७-४-० | - ७-१२-० | किरकोळ | ७५ | ९२-४-६ | + १७-४-६ |
| ग्रंथविक्री | ७५ | १२८-९-६ | + ५३-९-६ | संमे. ठराव अंमलबजावणी | ५० | ५९-७-० | + ९-७-० |
| सोलापूर संमेलन देणगी | ३०० | २००-०-० | -१००-०-० | निवडणूक | २०० | २१०-१०-६ | + १०-१०-६ |
| व्याज | ८२० | ७६२-११-१ | - ५७-४-११ | संमेलन खर्च | ५० | ४१-९-९ | - ८-६-३ |
| परीक्षा शुल्क अित्यादि | ६०० | ७६९-५-३ | +१६९-५-३ | द. सं. शा. स. देणगी | ० | २१-०-० | + २१-०-० |
| किरकोळ | ३० | ३३-६-० | + ३-६-० | शाखा समांस दिलेली रक्कम | १५० | १२८-१०-० | - २१-६-० |
| | | | | मा. पटवर्धन सा. मं. अुद्घाटन | ० | १५०-२-३ | +१५०-२-३ |
| | | | | अुपसमित्या | ७५ | १०-२-० | - ६४-१४-० |
| | | | | किरकोळ सामान | ५० | ७-८-६ | - ४२-७-६ |

## महाराष्ट्र साहित्य परिषद्

### अंदाजपत्रक (१९४३)

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| व्याज– ट्रस्टींकडून | ७५०–०–० | कचेरी खर्च | १४००–०–० |
| व्याज– अिचलकरंजी ट्रस्ट | १४०–०–० | पत्रिका खर्च | १६००–०–० |
| साधा. सभासद वर्गणी | १८००–०–० | संमेलन खर्च | २५–०–० |
| पत्रिका वर्गणी | १००–०–० | संमेलन ठराव अंमलबजावणी | २५–०–० |
| संलग्न संस्था | ७५–०–० | शाखा सभा | १००–०–० |
| ग्रंथविक्री | १००–०–० | प्रवास प्रचार | ५०–०–० |
| परीक्षा शुल्क अि. | ११००–०–० | अुपसमित्या | ५०–०–० |
| भाडें अि. | ३००–०–० | परीक्षा खर्च | ३८०–०–० |
| जाहिराती | ६०–०–० | कचेरी सामान | २५–०–० |
| म्युनिसिपल ग्रँट | १००–०–० | किरकोळ | ६०–०–० |
| | | कर्जव्याज | ३६०–०–० |
| | | परि. संमे. अितिहास | ३५०–०–० |
| | | विद्वत्परिषद् | ७५–०–० |
| | | शिल्लक | २५–०–० |
| | ४५२५–०–० | | ४५२५–०–० |

# परिषद्वार्ता



(चिटणीसांकडून).

मागील परिषद्वार्ता लिहिल्यानंतर कार्यकारी मंडळाच्या ता. २८ मार्च व २५ अेप्रिल या दिवशीं सभा झाल्या.

ता. २८ मार्चच्या सभेंत चिटणिसांनी तयार केलेलें अंदाजपत्रक कांही फेरफारानंतर मान्य करण्यांत आलें. हें अंदाजपत्रक याच अंकीं अितरत्र प्रसिद्ध करण्यांत आलें आहे.

दुखवट्याचे खालील ठराव करण्यांत आले:—

"(१) परिषदेचे अेक सभासद सुप्रसिद्ध अितिहाससंशोधक व लेखक रा. ब. वासुदेव अनंत बांबर्डेकर हे वांद्रें मुक्कामीं ता. ३-२-४३ रोजीं कालवश झाले. श्री. बांबर्डेकर हे सरकारी नोकरींत मोठ्या हुद्यावर होते. नोकरी संभाळून जवळ जवळ ४० वर्षें त्यांनी लेखन व संशोधन केलें. कोंकणच्या अितिहासाविषयीं संशोधनपूर्वक लिहिलेले लेख व 'मठगांवचा शिलालेख', 'भट्टोजी दीक्षित' हे त्यांचे ग्रंथ संशोधनक्षेत्रांत फार मान्यता पावलेले आहेत. त्यांच्या निधनाने महाराष्ट्रांतील अेक व्यासंगी विद्वान नाहीसा झाला याबद्दल कार्यकारी मंडळास खेद होत आहे."

"(२) परिषदेचे अेक सभासद श्री. वि. पां. नेने हे बडोदें येथे ता. २-२-४३ दिवशीं कालवश झाले. श्री. नेने यांनी मराठी व अिंग्रजी भाषांतून प्रसंगोपात्त पुष्कळ लिखाण केलें असून 'सयाजी गौरव ग्रंथ', 'बडोद्याचा राज्यकारभार' अित्यादि ग्रंथ संपादिले आहेत. विशेषतः 'अर्वाचीन मराठी साहित्य' हा श्री. नेन्यांनी संपादिलेला ग्रंथ संपादनकौशल्याचा अेक सुंदर नमुना म्हणून समजला जातो. त्यांच्या अकालीं निधनाने महाराष्ट्र भाषा व साहित्य यांजबद्दल आस्था बाळगणारा अेक विद्वान लेखक, संपादक व प्रकाशक नाहीसा झाला याबद्दल कार्यकारी मंडळास अतिशय दुःख होत आहे."

"(३) महाविदर्भांतील अेक अग्रगण्य अितिहाससंशोधक व ग्रंथकार श्री. यादव माधव काळे हे ता. ११-३-४३ रोजीं कालवश झाले. 'वऱ्हाडचा अितिहास', 'नागपूरकर भोसल्यांचा अितिहास' हे श्री. काळे यांचे ग्रंथ विद्वन्मान्य असून प्रस्तुत ग्रंथांमुळे महाविदर्भाच्या अितिहासरचनेची रूपरेखा तयार झाली असें म्हणावयास हरकत नाही. यांच्या निधनाने अेक जुना विद्वान संशोधक नाहीसा झाला यामुळे कार्यकारी मंडळास दुःख होत आहे."

"(४) सुप्रसिद्ध नाटककार व नाट्यव्यवसायी श्री. यशवंत नारायण टिपणीस हे ता. २५-३-४३ रोजीं मुंबअी येथे निधन पावले. श्री. टिपणीस यांना नाट्याची गोडी लहानपणापासूनच लागली व त्यांच्या हातून 'शहा शिवाजी', 'मत्स्यगंधा', 'चंद्रग्रहण' अि० अनेक नाटकें लिहिलीं गेलीं. त्यांच्या निधनाने मराठी नाट्यसृष्टीचा अेक जुना माहीतगार, अुत्तम नट व नाटककार नाहीसा झाला याबद्दल कार्यकारी मंडळास फार दुःख होत आहे."

ता. २५ अेप्रिलच्या सभेंत पुढील कामें झालीं:—

(१) भोजनादि कार्यक्रम अगर ज्यायोगें अिमारतीची खराबी होअील असे कार्यक्रम यांव्यतिरिक्त विवाह, मौंजीबंधन अित्यादि कार्यांसाठी 'पटवर्धन साहित्य मंदिर' भाड्याने देण्यास हरकत नाही असें ठरलें.

(२) १९४३-४५ या सालासाठी प्रसिद्ध केलेल्या परीक्षा माहिती पत्रकांतील (पत्रिका अं. ६४) परीक्षांस बसणाऱ्या अुमेदवारांच्या लायकीसंबंधीचे चारहि नियम रद्द करण्यांत येअून त्यांअैवजी खालीलप्रमाणे नियम करण्यांत आले:—

(अ) प्रथमा, प्रवेश व प्राज्ञ या परीक्षांस यथासामर्थ्य कोणांसहि बसतां येअील.

(आ) प्राज्ञ परीक्षा अुत्तीर्ण झालेल्यांसच विशारद परीक्षेस बसतां येअील.

(३) अि. स. १९४२ चे हिशेब सभेने मान्य केले.

सभेंत दुखवट्याचे खालील ठराव करण्यांत आले:—

"(१) व्याकरणकार श्री. मोरेश्वर सखाराम मोने हे ता. १५ अेप्रिल १९४३ या दिवशीं निधन पावले. श्री. मोने यांनी लिहिलेल्या पुस्तकांतील 'मराठी व्याकरणकार व प्रबंधकार' हें पुस्तक वैशिष्ट्यपूर्ण असून त्यांचे व्याकरण, छंद वगैरेंविषयी अनेक लेख वृत्तपत्रांतून येत असत. त्यांच्या निधनाबद्दल परिषदेच्या कार्यकारी मंडळास खेद होत."

"(२) परिषदेचे अेक सदस्य मुं. ब. श्री. दत्तात्रेय भिकाजी रानडे यांच्या मृत्यूमुळे परिषदेच्या कार्यकारी मंडळास अत्यंत खेद होत आहे. श्री रानडे हे अिंदूर येथील अेक प्रसिद्ध नागरिक असून १९३५ सालीं अिंदूर येथे जें महाराष्ट्र साहित्य संमेलन भरलें त्या वेळच्या चिटणीसद्वयापैकी अेक होते, व हें संमेलन यशस्वी होण्यास त्यांच्या कार्यनिष्ठेची फार मदत झाली. त्यांच्या निधनामुळे त्यांच्या कुटुंबीयांच्या दुःखांत कार्यकारी मंडळ सहभागी आहे."

"(३) परिषदेच्या मध्यप्रांत शाखासभेंतील अेक सभासद डॉ. लक्ष्मणराव कोकर्डेकर यांच्या अपघाती निधनामुळे परिषदेच्या कार्यकारी मंडळास अत्यंत खेद होत असून त्यांच्या कुटुंबियांस होणाऱ्या दुःखांत परिषदेचें कार्यकारी मंडळ सहभागी आहे."

**संमेलन**:—१९४३ सालीं सांगली येथे महाराष्ट्र साहित्य संमेलन भरविण्याबद्दल परिषदेच्या सांगली येथील दक्षिणी संस्थान साहित्य सभेने आमंत्रण दिलें होतें, परंतु सध्याची प्रतिकूल परिस्थिति अनुकूल होअीपर्यंत संमेलन भरविण्याची योजना स्थगित करावी लागत आहे, असें शाखासभा अध्यक्ष प्रा. गं. गो. कानेटकर यांचें पत्र आलें आहे.

नाशिक येथील महाराष्ट्र साहित्य संमेलनांतील ठराव ८ अन्वयें चालू वर्षी 'अितिहास' या विषयावर अेक वाङ्मयसंमेलन भरविण्याची योजना केली असून सुप्रसिद्ध रियासतकार रा. ब. गो. स. सरदेसाअी यांच्या अध्यक्षतेखाली हें संमेलन ता. १ व २ जून दिवशीं भरेल. या संमेलनाचें स्वरूप, कार्यक्रम अित्यादि बाबतची माहिती या अंकांत अितरत्र प्रसिद्ध केली आहे.

**संकीर्ण**:— सुप्रसिद्ध कादंबरीकार श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर यांनी ता. ५ मार्च दिवशीं माधवराव पटवर्धन साहित्य मंदिरास भेट दिली.

परिषदेने केलेल्या अर्जाचा अनुकूल विचार करून चालू वर्षी पुणें नगरपालिकेने रु. १०० ची देणगी परिषदेस दिली. या कामीं श्री. तुळशीबागवाले, श्री. गोसावी वगैरे अनेक नगरपित्यांचें साहाय्य झालें. परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे सभासद प्रो. डॉ. न. का. घारपुरे यांचेहि विशेष श्रम ही देणगी मिळवून देण्याच्या कामीं कारणीभूत झाले.

अनुक्रमणिका

## नवीन सभासद

### तहहयात

१ श्री. दिननाथ बळवंत वसिष्ट, दादर
२ श्रीमंत सौ. अिंदुमती राजे राजवाडे, सांगली
३ श्री. यशवंत आबाजी भट, कलकत्ता

### साधारणांतून तहहयात

१ श्री. पुरुषोत्तम मंगेश लाड, बेळगांव
२ प्रा. पुरुषोत्तम विश्वनाथ बापट, लष्कर (ग्वाल्हेर)

### साधारण

१ श्री. दा. श्री. गणपुले, मुंबअी ७
२ ,, रामानंद यति, नालवाडी
३ प्रा. वि. पां. दांडेकर, बडोदें
४ ,, श्रीपाद महादेव माटे, पुणें
५ श्री. नीलकंठ चिंतामण मराठे, मुंबअी ७
६ ,, वसंत बापुराव चितळे, कलकत्ता
७ ,, शिवराम दत्तात्रेय पालकर ,,
८ ,, भगवंत आंबाजी दप्तरदार, सांगली
९ श्री. रामचंद्र केशव रानडे, सांगली
१० ,, दामोदर आत्माराम पित्रे, सांगली
११ ,, बळवंत शिवलिंग कोरे ,,
१२ ,, गोपाळ गोविंद मुजुमदार (साधुदास) सांगली
१३ ,, महादेव हरि गोडबोले ,,
१४ ,, पांडुरंग कृष्ण दांडेकर ,,
१५ ,, केशवराव अप्पाजी चौगुले ,,
१६ ,, रघुनाथ माधव गोरे ,,
१७ ,, पांडुरंग रामचंद्र खाडिलकर ,,
१८ ,, शंकर गणेश गाडगीळ ,,
१९ ,, वामन जनार्दन कुंटे ,,
२० ,, सय्यद अहमद अमीन ,,
२१ सौ. मालतीबाअी दांडेकर, बुधगांव
२२ श्री. शिवाजी संभाजी शिर्के, वाळवें
२३ ,, हेमचंद्र दत्तात्रेय शशितल, कलकत्ता
२४ ,, सदाशिव केशव दातार ,,

---

## संलग्नसंस्थावृत्त

### मुंबअी मराठी ग्रंथसंग्रहालय

या संस्थेचें यंदाचें स्नेहसंमेलन डॉ. शामराव रामराव मुळगांवकर यांच्या अध्यक्षतेखाली दि. ३० जानेवारी या दिवशीं झालें. या प्रसंगीं सभासदांमध्ये संग्रहालयाच्या कार्याविषयी चर्चा, भावगीतगायन, मास्तर कृष्णराव यांचें गायन वगैरे कार्यक्रम झाला. संमेलनखर्च वजा जाऊन संग्रहालयाला सुमारें सातशे रुपये अुत्पन्न झालें.

दि. ब. नारायणराव वि. सायन्ना व डॉ. शामराव मुळगांवकर यांनी प्रत्येकीं पांचशे रुपयांची संस्थेला देणगी दिली. याशिवाय गेल्या दोन महिन्यांत संस्थेला सोळा आजीव सभासद लाभले आहेत.

संग्रहालयातर्फे सध्यां अर्वाचीन मराठी साहित्याच्या आरंभींच्या काळाचा अितिहास सांगणारी 'गुंजीकर व्याख्यानमाला' चालू असून दि. ३० अेप्रिलला तिची समाप्ति होअील. मालेंत होणारीं व्याख्यानें पुस्तकरूपानें छापलीं जावयाचीं आहेत.

संस्थेची अेक नवी वाचनालयशाखा लॅमिंग्टन रोड विभागांत उघडण्याची योजना चालू असून सदर शाखेचा अनावरणसमारंभ अेक दोन महिन्यांतच होअील अशी अपेक्षा आहे.

मार्च १९४३.

## वाङ्मयोपासक मंडळ, अहमदनगर

### वार्षिक सभा व चौदावा वार्षिक दिन

वाङ्मयोपासक मंडळ, नगर, या साहित्यसंस्थेची वार्षिक सभा दिनांक २९-३-४३ रोजीं सायंकाळीं नगर शहर पालिकेच्या दिवाणखान्यांत मंडळाचे अध्यक्ष रा. ब. न. बा. देशमुख यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. मंडळाचे चिटणीस श्री. द. बा. डावरे यांनी मंडळाच्या कामगिरीचें १९४२ सालचें अितिवृत्त सांगितलें. दुसरे चिटणीस श्री. प. प. पटवर्धन यांनी अंदाजपत्रक व ताळेबंद सभेपुढे मांडला व तो सर्वानुमतें मंजूर झाल्यावर १९४३ सालाकरिता पुढील पदाधिकारी निवडण्यांत आलेः—

अध्यक्ष—रा. ब. न. बा. देशमुख. उपाध्यक्ष—(१) ले. कर्नल प. कृ. चितळे. (२) श्री. त्र्यं. गं. धनेश्वर. कार्याध्यक्ष—श्री. रा. ब. हिवरगांवकर. चिटणीस—श्री. द. बा. डावरे, श्री. प. प. पटवर्धन. हिशेबतपासनीस—श्री. बा. ना. दातार. कार्यकारी मंडळ—श्री. द. वि. आपटे, श्री. शं. बा. आंबेकर, श्री. ग. कृ. फाटक, श्री. मो. त्र्यं. घोटणकर, सौ. वेणुबाअी मोडक, श्री. गो. रा. गायकैवारी, श्री. गो. वा. पंडित, श्री. गो. वि. राजगुरु.

### चौदावा वार्षिक दिन

निवडणुकीनंतर सुप्रसिद्ध साहित्यिक प्रा. वामन मल्हार जोशी यांच्या अध्यक्षतेखाली मंडळाचा चौदावा वार्षिक दिन साजरा झाला. "माझीं कांही मतें" या विषयावर अध्यक्षांचें भाषण झालें. या समारंभानिमित्त शुभ संदेश आले होते. प्रा. वामनराव जोशी यांना ६० वर्षें पूर्ण झालीं म्हणून मंडळाने त्यांचें जाहीर अभिनंदन व सत्कार केला. या सत्कारसमारंभांत शहरांतील निरनिराळ्या वीस संस्थांनी भाग घेतला होता. कु. शेवडे, श्री. नवाथे, श्री. घोटण-कर, श्री. हिवरगांवकर व कवि टेंमुर्णीकर यांनी गुणवर्णनपर भाषणें केली. श्री. पटवर्धन यांनी आभार मानल्यावर राष्ट्रगीत होऊन समारंभ यशस्वीरीत्या पार पडला.

---

## साभार पोंच

(१) **श्रीज्ञानेश्वरी टीका** : (मूळासह राजवाडेप्रत) लेखक : कै. गणेश कृष्ण आगाशे; प्रका० इंटर नॅशनल बुक सर्व्हिस. मूल्य १० रु.

प्रस्तुत ग्रंथांत श्री. आगाशे यांनी समग्र ज्ञानेश्वरीवर अर्थनिर्णायक चर्चा करून टीपा दिलेल्या पांच भागांचा आणि शेवटच्या अुपसंहाराच्या शंभरअेक पानांच्या ६ व्या भागाचा समावेश झालेला आहे. ज्ञानेश्वरीचा केवळ शब्दार्थ न देतां तिची स्वतंत्रपणें अर्थचर्चा करण्याचा मराठीमधील हा अेकच प्रयत्न आहे. पूर्वी निरनिराळ्या भागांमध्ये अुपलब्ध असलेला हा प्रयत्न आता अुपसंहारामधील चर्चेसह अेकत्र अुपलब्ध झालेला आहे. चर्चेसाठी सांप्रदायिक प्रत न घेतां राजवाडे यांची प्रत स्वीकारली आहे यावरून लेखकाची दृष्टि केवळ सांप्रदायिक नाही हें लक्षांत येअील. राजवाडे प्रत दुर्मिळ झाली असतांनाहि तिचीच प्रतिकृति अभ्यासकास टीपांसहित अुपलब्ध होते आहे ही आनंदाची गोष्ट आहे. अितकें सांगितल्यावर ग्रंथ संग्राह्य आहे हें सांगावयास पाहिजे असें नाही.

(२) **म. गांधी व हिंदुस्थान सरकार यांजमधील समग्र पत्रव्यवहार** : अनुवादक श्री. ग. गं. जांभेकर (संपादक, लोकशिक्षण); किं. ४ आणे.

मूळ इंग्रजीमधून प्रसिद्ध झालेल्या या अत्यंत महत्त्वाच्या पत्रव्यवहाराचें केवळ मराठी वाचकांकरिता समग्र भाषान्तर अुपलब्ध असणें फार आवश्यक होतें. भाषान्तर यथार्थ व सुबोध झालें आहे.

**संपा.**

# संपादकीय

गेल्या अंकानंतर पत्रिकेवर मजकुराच्या दृष्टीने आणखी बंधन पडलें आहे हें या अंकाचा आकार पाहून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. त्यामुळे मनांत नसूनहि स्वतंत्र लेखांची संख्या कमी करावी लागली आहे. परीक्षणें मात्र शक्यतोंवर कायम ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. प्रत्यहीं निघणाऱ्या नवनवीन पुस्तकांवर सविस्तर अशीं परीक्षणें अितरत्र येणें आता अशक्य झाल्याने पत्रिकेंत तरी तीं यावींत या धोरणानेच हें चालू ठेविलें आहे. या अंकांत महाराष्ट्राच्या सीमाप्रान्तांमधून मराठी साहित्यविषयक चाललेल्या हालचालींचीं दोन बातमीपत्रें दिलीं आहेत तीं वाचकांस मान्य होतील अशी आशा आहे. अितर ठिकाणांहून आलेल्या बातमीपत्रांनाहि योग्य तें स्थान मिळेल. सीमाप्रान्तांमधील लोकांनी यावावत आमच्याबरोबर सहकार्य करावें अशी विनंती आहे. मागच्या अंकांत सुचविल्याप्रमाणे मेअखेर परिषदेच्या विद्यमानें अितिहास या विषयावर विचारविनिमय करण्याकरता अेक अभ्यासु विद्वानांची परिषद् भरणार आहे, हें दुसरीकडे दिलेल्या पत्रकावरून कळून येअील. यांत अितर कोणत्या संस्थेच्या कार्यावर आक्रमण करण्याचा हेतु नाही हें स्पष्ट करावयास पाहिजेच असें नाही. अितिहास व विविध वाङ्मयप्रकार अथवा कलाप्रकार यांचे परस्परसंबंध काय असावेत या विचाराला त्यांत प्राधान्य देण्यांत येअील. हा विचार साहित्यपरिषदेच्या कक्षेंत सहजच येतो, किंबहुना हा तिचाच प्रान्त आहे. अितिहासाप्रमाणेच नाट्य, संगीत किंवा वृत्तव्यवसाय अित्यादींचा साहित्याशीं येणारा संबंधहि अशा परिषदेचें योग्य क्षेत्र क्रमाक्रमाने होअीलच. तेव्हा हें आपल्या क्षेत्रावर आक्रमण होत आहे अशा विचाराने कोणीं बिचकून जाअूं नये व शक्य तें सहकार्य परिषदेबरोबर करावें.

× × ×

बहुतेक सारीं नियतकालिकें 'कूर्मोऽङ्गानीव' आपला विस्तार कमी करीत असतां किंवा विराम वा स्वल्पविराम घेअूं लागलीं असतांनाहि 'अभिरुचि' या नवीन मासिकाचा जन्म झाला आहे. आम्ही या नवागताचें मनःपूर्वक स्वागत करतों. याचें स्वरूप कांहींसें संग्रहाचें असलें तरी नवीन स्वतंत्र लेखनासहि त्यांत वाव आहेच. अुच्च अभिरुचीचा पुकार करीत आगमन करणाऱ्या या नवागताच्या शब्दांत आणि वर्तनांत आज तरी मेळ आहे ही गोष्ट खरोखरच अभिनंदनार्ह आहे. तो पुढेहि राहील अशी आम्ही आशा करतों. आज हें मासिक आकाराने लहानच असलें तरी त्याच्या हातून प्रस्तुतच्या साहित्यविषयक 'निदाघा' मध्ये मराठी साहित्यास जें 'अल्प' का होअीना पाणी मिळेल त्याची किंमत पुढे येणाऱ्या किंवा मागे येअून गेलेल्या वर्षाकालांतील 'धारासारा'पेक्षा केव्हाहि अधिक होअील. याच साहित्यविषयक ग्रीष्म ऋतूमध्ये आपल्या अंगावरील पालवी बरीचशी कायम ठेवून अुभ्या असलेल्या 'सह्याद्री'ने आपले शंभर अंक पूर्ण करून दुसऱ्या शतकांत प्रवेश केला याबद्दल त्याचेंहि अभिनंदन करणें आवश्यक आहे. सह्याद्रीची दृष्टि केवळ साहित्यविषयक नसूनहि त्यांत साहित्याविषयक लेखन बरेंच येत असतें. भिन्न भिन्न अभिरुचीच्या वाचकांचें समाराधन करण्याचें ध्येय पुढे ठेवूनसुद्धा सह्याद्रीने आपली पदवी वरच कायम ठेविली आहे. आपलें धोरण निश्चित करून तें कायम राखून कोणाच्याहि अवास्तव अधिक्षेपाने विचलित न होतां आपलें कार्य करीत राहण्याचें त्याचें धोरण अभिनंदनार्ह आहे.

× × ×

पुढील अंकीं 'ज्ञानेश्वरांचा तोतया' हा डॉ. शं. दा. पेंडसे यांचा लेख प्रसिद्ध होअील.

म. सा. प. (१६-२-१०)

# साभार स्वीकार

१ अुमजापूरचा आनंदराव— ले० श्या. कृ. क्षीरसागर; प्रका० के. भि. ढवळे, श्री समर्थ सदन, गिरगांव, मुंबअी; मूल्य आणे २॥.

२ कागद— ले० बापूराव शिवराम नाअीक; प्रका० शं. न. जोशी, चित्रशाळा प्रेस, पुणें २; मूल्य रु. १॥.

३ विज्ञानप्रवेश (अियत्ता ५, ६ व ७ वी साठी)— ले० रा. गो. श्रीखंडे, बी. ए., बी.टी. व गो. स. नणदीकर, बी.एस्सी., बी.टी., तिसरी आवृत्ति १९४१; प्रका० दा. ना. मोघे, स्कूल ॲन्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; मूल्य रु. २.

४ धर्मनिर्णयमंडळाचा आठव्या वर्षाचा (१८६४) वृत्तान्त— प्रका० पं. रघुनाथशास्त्री कोकजे, लोणावळें.

५ पुष्पगुच्छ— ले० व प्रका० के. डी. भाटे, धुळें; मूल्य रु. १.

६ आभास ,, ,, आ. १२.

७ जागतिक स्वरूपांत शास्त्रशुद्ध आपली लिपि— ले० व प्रका० बा. ग. टांकसाळे.

८ ज्ञानोदयाचीं पहिलीं शंभर वर्षे (१८४२ ते १९४१) ग्रंथ पहिला १८४२ ते १८६१— संपा० रेव्ह. भा. पां. हिवाळे, मुंबअी; मूल्य रु. १।.

९ चिनी गनिमांची आअी— ले० आय्. एफ्टीन; प्रका० म. ह. गुहागरकर, १८६ फणसवाडी, मुंबअी; मूल्य आणे २.

१० वेटिंग रूम— ले० व प्रका० ना. ह. आपटे, आपटे आणि मंडळी, कोरेगांव (सातारा); मूल्य रु. १॥.

११ संसारांत पडण्यापूर्वी— ले० ना. ह. आपटे; प्रका० गो. वा. कुळकर्णी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; मूल्य रु. १॥.

१२ सज्जनगड— ले० रा. सा. गं. के. देशपांडे; प्रका० पां. रा. आंबिके, संपादक महाराष्ट्र, पुणें २; मूल्य आणे ४.

१३ लघुकथा कशा लिहाव्या— ले० वा. कृ. गलगली; प्रका० किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी; मूल्य आणे ८.

१४ मुलांचा आनंद— ले० दा. वि फफे, कुलाबा; प्रका० के. भि. ढवळे, मुंबअी; मूल्य आ. ४.

१५ आपला धर्म (मराठी अि. ५ ते ७ साठी)— ले० व संग्रा० दा. वि. फफे, प्रका० के. भि. ढवळे, मूल्य आ. ५.

१६ महारोग— ले० व प्रका० म. ब. दिवाण मंत्री, महारोगी सेवामंडळ, वर्धा; मूल्य आ. १२.

[पुढील मजकूर मलपृष्ठ चार वर पहा.

# महाराष्ट्र साहित्य परिषद्



## नियामक मंडळाच्या सभेची सूचना

म. सा. परिषदेच्या नियामक मंडळाची सभा ता. १ जून १९४३ मंगळवारीं सायंकाळीं ४॥ वाजतां परिषदेच्या कार्यालयांत भरेल. सभेंत खालील कामांचा विचार होईल.

### कामें

(१) मागील सभांचे वृत्तान्त.
(२) गेल्या सभेनंतर निधन पावलेले साहित्यिक व साहित्यसेवक यांजबद्दल दुखवटा.
(३) १९४२ चें अितिवृत्त व हिशेब. (पत्रिका अंक ६६, पृ. १६५-१७३ पाहा).
(४) १९४३ या वर्षासाठीं अंदाजपत्रक (पत्रिका अंक ६६, पृ. १७४ पाहा.)
(५) नाशिक संमेलनांत मान्य झालेल्या ठरावांच्या अंमलबजावणीचा पहिला सहामाही वृत्तान्त.
(६) वार्षिक साधारण सभेपुढे मांडावयाचीं कामें.
(७) प्रा. द. वा. पोतदार यांचें पत्र (विषय : म. सा. संमेलनांचीं दप्तरें परिषदेने संग्रहार्थ ठेवावीं.)
(८) अध्यक्षांच्या संमतीने सभेंत मांडण्यांत येणारीं अितर कामें.

## वार्षिक साधारण सभेची सूचना

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा ता. १ जून १९४३ मंगळवारीं सायंकाळीं ५॥ वाजतां परिषदेच्या कार्यालयांत भरेल. सभेंत खालील कामांचा विचार होअील.

### कामें

(१) मागील सभेचा वृत्तान्त.
(२) गेल्या सभेनंतर निधन पावलेले साहित्यिक व साहित्यसेवक यांजबद्दल दुखवटा.
(३) १९४२ चें अितिवृत्त व हिशेब. (पत्रिका अंक ६६, पृ. १६५-१७३ पाहा.)
(४) १९४३ या वर्षासाठीं हिशेबतपासनिसांची नेमणूक.
(५) नाशिक संमेलनांत मान्य झालेल्या ठरावांच्या अंमलबजावणीचा पहिला सहामाही वृत्तान्त.
(६) श्री. कृ. गो. मराठे यांचें पत्र.
(७) अध्यक्षांच्या संमतीने सभेंत मांडण्यांत येणारीं अितर कामें.

वा. म. जोशी
अध्यक्ष
र. लु. जोशी
कार्याध्यक्ष

के. नारायण काळे
चा. दा. गोखले
चिटणीस
ता. १० मे १९४३

१७ आओी ('कॅरेल कॅपक्'कृत मदर)—अनुवा० माधव मनोहर; प्रका० पद्मप्रकाशन मूल्य आ. १२.

१८ शांघायचा फॅक्टरी अिन्स्पेक्टर—ले० अेडगर स्नो; प्रका० प. के. चचड, मथुरादास बिल्डिंग, गणेशलेन, लालबाग मुंबअी १२; मूल्य आ. २.

१९ नव्या वाटा—ले० सौ. आनंदीबाअी किर्लोस्कर; प्रका० किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी; मूल्य रु. १.

२० काशिनाथ—सं० मा. वि. वरेरकर; अनु० प. वा. कुलकर्णी; प्रका० नवभारत प्रकाशनसंस्था, ६ केळेवाडी, मुंबअी ४, मूल्य रु. १॥.

२१ पितापुत्रसंबंध—ले० व प्रका० य. रा. दाते, कर्तव्याश्रम, पुणें ४; मूल्य रु. २.

२२ ठिणग्या—ले० य. ग. वझे; प्रका० ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य रु. १॥.

प्रका० के. भि. ढवळे, श्री समर्थ सदन, यांचीं प्रकाशनें :—

नाट्यछटा व संवाद—ले० के. गो. पंडित, मूल्य आणे ५; पत्रूताअीच्या गोष्टी—ले० मा. रा. भागवत, मूल्य आणे ६; तीळगूळ—ले० वि. वा. जोशी, मूल्य आणे ३; नवल-नगरची राज्यकन्या—ले० स. अ. शुक्ल, मूल्य आणे ४; मुलींची शाळा—ले० वि. कृ. नेरुरकर, मूल्य आणे २; माझ्या दृष्टींत—ले० बा. रा. देसाअी, मूल्य आणे ३; शर्मिष्ठा—ले० म. का. कारखानीस, मूल्य आणे ४; वेदांतील गोष्टी—ले० वि. कृ. श्रोत्रिय, मूल्य आणे ८.

श्री. बाळाजी प्रभाकर मोडक यांचे ग्रंथ

(१) अुष्णता पूर्वार्ध भा. २; (२) ऎंद्रिय रसायनशास्त्र पूर्वार्ध भा. १; (३) सेंद्रिय रसायनशास्त्र पूर्वार्ध भा. २; (४) अुपोद्घात; (५) विद्युत् आणि चुंबन; (६) ध्वनिशास्त्र आणि प्रकाशशास्त्र; (७) प्राणिशास्त्र (मूलतत्त्वें); (८) अुष्णताशास्त्राचीं मूलतत्त्वें; (९) पदार्थवर्णन भा. १ ला, खनिज पदार्थ; (१०) बालबोध यंत्रस्थितिशास्त्र; (११) आरोग्य-शास्त्र भा. १ व २; (१२) सृष्टिशास्त्राचीं मूलतत्त्वें अुत्तरार्ध भा. १ घर्षणजन्य विद्युत्; (१३) बालबोध यंत्रस्थितिशास्त्र यावरील प्रश्न व अुदाहरणें; (१४) ध्वनिशास्त्रावरील व्याख्यानें.

---

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता वामन मल्हार जोशी यांनी प्रसिद्ध केलें.